6020



घायाळ स्पार्ताकुस
(इटलीतील पॉम्पे येथील भित्ती चित्र)

# स्पाताकुस



**संक्षिप्तीकरण आणि रूपांतर**

**नरेंद्र बोडके**

---

किंमत ६० रुपये

# दोन शब्द

बलाढ्य-धनाढ्य रोमन साम्राज्यातली ही कहाणी आहे. कोट्यवधी गुलामांच्या रक्त-अश्रू आणि घामावर उभारलेले, क्रौर्य आणि भोगलालसेने बरबटलेले रोमन साम्राज्य. या साम्राज्यात- इटलीतल्या कापुआ शहरात योद्धे गुलाम बंड करून उठले. त्यांचा म्होरक्या होता स्पार्ताकुस. या गुलामांनी कापुआतील रोमन सेनेला पराभूत केले. त्यांची शस्त्रे घेऊन शिस्तबद्ध गुलाम सेना संघटित केली. शेतांवरचे, घरांमधले हजारो गुलाम त्यांना येऊन मिळाले. इ.स.पूर्व ७४ साली लढाईला तोंड फुटले. गुलाम सेनेने रोमन सेनेच्या पलटणीवर पलटणी नामोहरम केल्या. अखेर चार वर्षांनी प्रबळ शस्त्रसज्ज रोमन सेनेने गुलामांना कोंडीत पकडून विजय मिळवला. सारे गुलाम जर स्पार्ताकुसला मिळते तर रोमन साम्राज्याचा पायाच उखडला असता व साम्राज्य कोसळले असते. पण सारेच गुलाम धोका पत्करायला तयार नव्हते. परिणामी ....

स्पार्ताकुसच्या क्रांतिकारी उठावाच्या ऐतिहासिक घटनेवर आधारित 'स्पार्टाकस' ही कादंबरी अमेरिकन लेखक होवर्ड फास्ट यांनी १९५१ साली लिहिली. ती फार स्फूर्तिदायी ठरली. त्यावर बोलपटही निघाला. त्या कादंबरीचे संक्षिप्त रुपांतर मराठीत सादर करत आहोत.

आज ही कादंबरी विशेष महत्त्वाची वाटते. रोमन साम्राज्याप्रमाणे आज अमेरिकन साम्राज्यशहा जगभरच्या जनतेला अत्यंत क्रूर आणि सैतानी हल्ल्यांखाली चिरडत आहेत. अमली पदार्थ- खुनाखुनी-चंगळवाद-यांच्या अंमलाखाली रोमन समाजाप्रमाणेच अमेरिकन समाज अध:पततित व अमानुष बनत आहे. अमेरिकन राज्यकर्ते साऱ्या जगाला विनाशाच्या उंबरठ्यावर ढकलत आहेत. त्याचबरोबर अमेरिकेत, युरोपात, अरब राष्ट्रात, आफ्रिकेत - साऱ्या जगातच अमेरिकेच्या या बेगुमान आर्थिक- सांस्कृतिक - राजकीय आक्रमणाविरुद्ध श्रमिक जनता उठत आहे. पण हे सारे प्रयत्न विखुरलेले आहेत आणि अमेरिकन साम्राज्यशहांचे हस्तक बनलेले सौदी, भारतीय, पाकिस्तानी, मेक्सिकन राज्यकर्ते जनतेचे उठाव निर्घृणपणे चिरडत आहेत. स्पार्ताकुसप्रमाणे वर्गविरहित, समानतापर, न्याय्य व भ्रातृभावी नवे जग उभारण्याचा आदर्श आपणास पुढे ठेवायचा आहे. यासाठी देशोदेशीचे मांडलिक राजे आणि अमेरिकन सम्राट या दोहोंविरुद्ध लढण्याचा व्यूह आपणास रचायचा आहे. आजच्या आव्हानांना सामोरे जाण्यास आसुसलेल्या तरुण-तरुणींना स्पार्ताकुसचा लढा स्फूर्ती देईल, स्पार्ताकुसची विश्वदृष्टी चिंतनीय वाटेल या अपेक्षेने स्पार्ताकुसच्या क्रांतिलढ्याची कथा मराठी वाचकांच्या हाती देत आहोत.

रोमन नावांचे उच्चार इंग्रजी स्पेलिंगवरून मराठीत केले जातात. ते सर्रास चुकीचे असतात. त्यामुळे मूळ भाषेतील खुमारी हरवली जाते. म्हणून प्रस्तुत कादंबरीत लॅटिन भाषेतले उच्चार वापरले आहेत. (कादंबरीतील प्रमुख व्यक्तींचा परिचय पान क्र. ३४ वर दिला आहे)

**सुलभा ब्रह्मे**

शंकर ब्रह्मे समाजविज्ञान ग्रंथालय, पुणे — २८ सप्टेंबर २००२ - भगतसिंग दिन

---

**मुद्रक व प्रकाशक** : सुलभा ब्रह्मे, १२९ ब/२, एरंडवणे, लॉ कॉलेज रस्ता, पुणे - ४

**मुद्रणस्थळ** : संजीव मुद्रणालय, पुणे - ३०

# १. गुलामांच्या प्रेतावलीतून प्रवास

रोमहून कापुआला जाणारा हमरस्ता मार्च महिन्यात वाहतुकीला खुला झाला. सुरुवातीला फक्त व्यापाऱ्यांसाठी मोकळीक होती. पण हळूहळू वसंत ऋतुचे आगमन झाले. संपूर्ण इटलीवर एक आल्हादाचा शिडकावा झाला आणि मग सगळे बंध-निर्बंध त्यात विरघळून गेले. गेली चार वर्षे रोममधील सगळ्याच रस्त्यांवरील वाहतूक विस्कळीत झाली होती. व्यापाऱ्यांचे काफिले आणि पर्यटकांचे मेळे एकटे-दुकटे चाललेत असे दृश्य क्वचितच दिसायचे. पण आता हा हमरस्ता खुला झाला. पुन्हा एकदा कापुआचा सुंदर निसर्ग आणि देखण्या इमारती रोमवासीयांना हाकारे घालू लागल्या. कापुआमध्ये वेगवेगळ्या प्रकारची अत्तरे स्वस्तात मिळायची. सुगंधी द्रव्याचे वेड असलेल्यांना कापुआला जाऊन ती विकत घेणे परवडायचे. रोममध्ये अत्तरे फार महाग होती. कापुआत ती स्वस्तात तर मिळायचीच शिवाय तिथल्या निसर्गाच्या सान्निध्यात मनही फुलून यायचे. कापुआतील अत्तर कारखान्यांचा दबदबा सगळ्या जगात होता. अत्यंत दुर्मिळ असे सुगंधी अर्क जगभरातून गलबतांमधून कापुआला रवाना व्हायचे. इजिप्शियन गुलाबांच्या सुगंधांचा अर्क, शिबाराणीच्या देशातील लिलीच्या फुलांचा अर्क, गॅलिलीच्या पॉपीजचा सुगंध, चंदनाचा अर्क असे सारे जगभरातून कापुआला पाठवले जायचे. रोममधील स्त्री-पुरुषांचे अत्तराचे जबरदस्त वेड लक्षात घेतले तर कायुसने कापुआला जाण्याचा निर्णय घेणे सहज समजण्यासारखे होते. एक सुंदर सहलही झाली असती आणि दुर्मिळ अत्तराच्या कुप्या घेऊन येता आले असते.

◆◆◆◆

कायुस क्रासुस, त्याची बहीण हेलेना, तिची मैत्रिण क्लॉदिया मारियुस असे तिघे कापुआला निघाले. मे महिना सरत आला होता. हवेत गारवा होता आणि आसमंतात नितळ प्रकाशाची पखरण होती. प्रवासासाठी आल्हादकारक असे वातावरण होते. तिघेही तरुण जीव. चैतन्याने मुसमुसलेले. एका सुंदर सहलीच्या कल्पनेने त्यांचे डोळे चमकू लागले होते. कायुस ऐन पंचविशीतील. त्याचे गर्द कुरळे केस मानेपर्यंत रुळत. मजबूत बांध्याच्या खानदानी घराण्यातील हा तरुण साऱ्या इलाख्यात सर्वात देखणा म्हणून ओळखला जायचा. पांढऱ्या शुभ्र अरेबियन घोड्यावर तो स्वार झाला होता. त्याची बहीण आणि तिची मैत्रीण उघड्या डोल्यांमध्ये बसल्या होत्या. प्रत्येक डोली चार गुलामांनी खांद्यावर झेलून धरली होती. हे गुलाम इतके काटक होते, की जराही न थांबता एका वेळेस दहा मैलांचा पल्ला ते सहज गाठू शकत असत. प्रवासाला किमान पाच दिवस लागणार होते. रोज संध्याकाळी वाटेतील एखाद्या मित्राच्या किंवा नातेवाईकाच्या प्रासादात मुक्काम ठोकायचा आणि मजल

दर मजल करीत आरामात कापुआला पोहोचायचे असे त्यांनी ठरवले होते. गुलामांचे बंड मोडून काढल्यानंतर त्यांच्यावर जरब बसावी म्हणून हमरस्त्याच्या कडेने सर्वत्र त्यांचे मृतदेह लटकावून ठेवलेले होते. हे त्यांना ऐकून माहीत होते. पण ते दृश्य अस्वस्थ करून आपल्याला पोखरून टाकील याची त्यांना कल्पनाही नव्हती. उलट ऐकलेल्या वर्णनावरून दोघी मैत्रिणी थोड्या उत्तेजितही झाल्या होत्या. अशी दृश्ये आपल्यावर काही परिणाम करू शकणार नाहीत, असेच कायुसला वाटत होते. मुलींना तो म्हणाला, ''शेवटी असे असते... सुळावर स्वत: असण्यापेक्षा दुसऱ्या कुणाला लटकावलेले बघणे अधिक चांगले नाही का?''

हेलेना दिसायला क्लॉदियापेक्षा चांगली होती. क्लॉदिया जरी गोरीपान असली तरी निर्जीव वाटायची. तिची अंगकांती तजेलदार नव्हती. डोळ्यात चमक नव्हती व कायमच ती थकल्यासारखी वाटायची. आपल्या बहिणीने 'या' मुलीशी का म्हणून मैत्री केली आहे ते कायुसला आतापर्यंत कळले नव्हते. या प्रवासात हे कोडे उलगडून टाकायचे असा त्याने निर्धार केला होता.

रोम शहराबाहेर काही मैल गेल्यागेल्या त्यांना भयानकतेचे दर्शन घडले. रस्त्याच्या आसपास मोठी खडकाळ जागा होती. वाळूही पसरलेली होती आणि अशा नेमक्या ठिकाणी पहिला सूळ ठेवलेला होता. गुलामांचे बंड मोडून काढलेले आहे, फार मोठ्या प्रमाणात त्यांचे शिरकाण झालेले आहे, हे कळावे या हेतूने रस्त्यात सर्वत्र असे सूळ ठेवलेले होते आणि त्यावर गुलामांचे मृतदेह लटकावलेले होते. या जागचा सूळ जिवंत पाईन वृक्ष कापून बनवलेला होता. त्याचा रक्तवर्ण इतका प्रखर होता, की जणू काही ताज्या जखमेतून रक्त भळभळते आहे असे वाटावे. सकाळच्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर तो सूळ प्रचंड आणि रूद्रभीषण वाटे. कायुसने आपल्या घोड्याचा लगाम खेचला आणि त्याला सुळाच्या दिशेने वळवले. हेलेनानेही त्वरित गुलामांना डोली त्याच्या मागोमाग नेण्याचा हुकूम सोडला.

सुळापासून काही यार्ड अंतरावर एक वेताची खुर्ची होती. त्यावर एक जाडजूड माणूस बसला होता. त्याला पाहताचक्षणी तो सुखवस्तू असल्याचे जाणवत होते. त्याचे अवाढव्य सुटलेले पोट तो उत्तम खाता-पिता असल्याची ग्वाही देत होते. पण तो गरीबही असावा कारण त्याचे कपडे घाणेरडे होते आणि चेहऱ्यावर दाढीचे खुंट होते. स्वभावाने तो मोकळा-ढाकळा असावा असे तत्क्षणीच जाणवत होते. व्यावसायिक पुढारी असतात तसे. पण वर्षांनुवर्षे त्याला फोरम, सिनेट किंवा अगदी वॉर्डमध्येही स्थान मिळालेले नसावे असे त्याच्या आताच्या अवतारावरून वाटत होते. परिस्थिती अजून थोडी वाईट झाली असती तर तो भिकारीच झाला असता. रोमच्या कुठल्यातरी लॉजमध्ये केवळ एक चटई टाकण्यापुरती जागा त्याच्या ताब्यात होती. तरीही त्याचा आवाज बुलंद होता. जत्रेमध्ये विविध वस्तू विकणारे फेरीवाले जसे घसा ताणून अथक बोलतात तसा तो बोलत होता. आपल्या आजच्या अवस्थेचे

स्पष्टीकरणही त्याच्याकडे होते. काहीजण अगदी सहजपणे योग्य तो पक्ष निवडतात आणि त्यांची भरभराट होते. आपली निवड सतत चुकत गेली. त्यामुळे आपली ही अवस्था झाली. चांगल्या माणसांची प्रगतीच्या बाबतीत अशीच बोंब असते, हे सांगायला तो विसरला नाही.

''तुमच्या स्वागतासाठी मी उठून उभा राहू शकत नाही याबद्दल मला माफ करा, सभ्य स्त्री-पुरुष हो'', अशा नाट्यपूर्ण पद्धतीने त्याने त्यांचे स्वागत केले. ''पण काय करू, शेवटी हृदयाचा प्रश्न आहे.''

''कुठे, कापुआला निघालात का?''

''हो, कापुआ'' कायुस म्हणाला.

''काय सुंदर शहर आहे ते, काय देखणे, किती मोहक! शहरांमधला हिरा आहे कापुआ.''

हेलेना आणि क्लॉदिया यांच्या चेहऱ्यावर स्मितहास्य झळकले. समोरचा माणूस मनमोकळा दिसत होता. उत्तम विदूषक वाटत होता.

''मी एक वाटाड्या आहे असे समजा. गोष्टी सांगणारा मित्र आहे असे माना. शिक्षा ठरवणारा आणि न्याय देणारा एक छोटा माणूस आहे, असे समजा.''

दोन्ही युवतींची नजर पुन्हापुन्हा सुळाकडे जात होती. त्या स्वत:ला रोखू शकत नव्हत्या. सूळ आता अगदी त्यांच्या डोक्यावरच होता आणि त्यावर लटकलेला मृतदेह जवळून दिसत होता. उन्हाने काळवंडलेल्या आणि पक्ष्यांनी चोची मारून ठिकठिकाणी फोडलेल्या त्या नग्न देहाकडे त्यांची नजर खेचली गेली. त्या मृतदेहाभोवती कावळे जमा झाले होते. त्याच्या त्वचेवर माशा घोंगावत होत्या. सूळ थोडासा पुढे कललेल्या असल्यामुळे तो देह क्रूसाच्या बाहेर लटकत्या अवस्थेत होता आणि कधीही तो खाली पडेल असे वाटायचे. गतीचा एक आभास त्यामुळे निर्माण झाला होता. मृताची रुद्रभीषण गती. त्याचे डोके पुढच्या बाजूला झुकले होते आणि त्याच्या लांबसडक मातकट रंगाच्या केसांनी त्याचा चेहरा आणि त्यावरची भयानकता झाकली गेली होती.

कायुसने जाड्याला एक नाणे दिले. आभार मानण्यापलीकडे तो आणखी काही करणार नाही हे त्याने जाणले होते. डोलीचे वाहक मूकपणे बसून होते. नजर जमिनीला लावलेली. अगदी एकदाही त्यांनी सुळाकडे बघितले नाही. उघड्या पाठीवर त्यांनी एकेकाळी भरपूर वळ सोसलेले होते. शिस्तीचे उत्तम प्रशिक्षण त्यांना मिळालेले होते.

''खरे सांगायचे तर हा सूळ केवळ प्रतिकात्मक आहे. यात मानवी किंवा भयानक असे काहीही वाटून घेऊ नका.'' जाड्या म्हणला. ''रोमला जसे द्यायचे कळते तसेच पुरेपूर वसूल करायचेही कळते आणि इथे तर काय गुन्हाच एवढा खतरनाक होता... शिक्षाही त्याला साजेशीच असणार. येथून पुढे कापुआपर्यंत काय दिसणार आहे त्याची ही केवळ झलकच आहे. असे किती मृतदेह सगळ्या वाटेत क्रुसावर लटकवलेले आहेत, तुम्हाला माहीत आहे का?''

त्यांना माहीत होते पण त्यांना ते त्याच्या तोंडून ऐकायचे होते. या जाड्याने बोलता न येणाऱ्या विषयाला हात घातला होता. हे सगळे भयानक दृश्य चर्चा-चर्वित-चर्वण करण्यासारखे काही नाही, असे त्यांना वाटत होते. पण जाड्याने त्याचे अगदी एका सामान्य आणि स्वाभाविक विषयात रुपांतर करून टाकले होते. तो नेमका आकडा सांगेल असेही त्यांना वाटत होते.

''सहा हजार चारशे बहात्तर''. तो म्हणाला.

डोली वाहकांपैकी काहीजण शहारले. ते विश्रांती घेत नव्हते, तर गोठून गेल्यासारखे झाले होते. पण त्यांच्याकडे कुणाचेच लक्ष नसल्यामुळे कुणालाही ते कळले नाही.

''सहा हजार चारशे बहात्तर''. जाड्या पुन्हा म्हणाला.

''केवढं तरी लाकूड लागलं असेल इतक्या क्रुसांसाठी.'' कायुसने पुस्ती जोडली. हेलेनाला ते खरे वाटले नाही. पण जाड्याने अनुमतीदर्शक मान हलवली. आता त्यांच्यात आपोआपच जणू एक अनुबंध निर्माण झाला होता. जाड्याने आपल्या झग्यातून वेताची एक काठी काढली आणि ती क्रुसाच्या दिशेने रोखत म्हणाला, ''हे केवळ एक उदाहरण आहे. अगदी छोटासा दाखला आहे, असे म्हणा हवे तर.''

क्लॉदिया थोडी अस्वस्थ होती, तरीही ती खळखळून हसली. ''हा स्पार्ताकुस आहे का?'' तिने खुळ्यासारखे विचारले.

''नाही तो स्पार्ताकुस नाही.

''त्याचा मृतदेह सापडलाच नाही.'' कायुस उतावीळपणे म्हणाला.

''त्याचे तुकडे-तुकडे झाले.'' जाड्याने आढ्यतापूर्वक सांगितले. ''तुम्ही कोवळी मुले आहात. अशा गोष्टी तुमच्या समोर खरे तर बोलू नयेत. पण स्पार्ताकुसचे तुकडे-तुकडे झाले हे वास्तव आहे.''

क्लॉदिया शहारली, पण नजाकतीने. आणि कायुसला तिच्या डोळ्यात या आधी कधीही न पाहिलेली चमक दिसली. जाड्याकडे ती ज्या नजरेने बघत होती तसे कायुसकडे तिने आतापर्यंत एकदाही पाहिले नव्हते. जाड्याची टकळी चालूच होती.

''स्पार्ताकुसचे तुकडे-तुकडे झाले हे त्रिवार सत्य आहे आणि तरी ते म्हणतात स्पार्ताकुस अस्तित्वातच नव्हता. हा! हा!! मी अस्तित्वात आहे का? तुम्ही आहात का? या अतिभव्य आपिया महामार्गावर सहा हजार चारशे बहात्तर प्रेते लटकवलेली आहेत की नाहीत? अर्थातच आहेत आणि माझ्या तरुण मित्रांनो मी तुम्हाला एक प्रश्न विचारू इच्छितो. ही इतकी हजारो प्रेते लटकावण्याचे कारण काय? सर्वात कठोर शिक्षा कशी असू शकते, त्याचा हा दाखला आहे. पण सहा हजार चारशे बहात्तरच का?''

'' त्या कुत्र्यांना हीच शिक्षा योग्य होती.'' हेलेनाने शांतपणे उत्तर दिले.

''कदाचित त्यांची लायकी तीच असेल. पण खाण्यासाठी उपयोग होत नसेल तर इतकी जनावरे कापायची तरी कशाला?'' त्याने प्रश्न विचारला आणि उत्तरही दिले,

''मी तुम्हाला सांगतो. वातावरणात थोडी दहशत असली की स्थैर्य राहाते. लोक भाववाढही सहन करतात. आणि मुख्य म्हणजे समाजव्यवहारावर सत्ता कुणाची राहाणार याचा निर्णय लागून जातो. स्वामित्वाचा नाजूक प्रश्न सुटून जातो.'' आपली वेताची काठी लटकत्या मृतदेहाकडे रोखत तो म्हणाला.

''आत याचेच पाहा ना! हा आहे फेअरत्राक्स. अत्यंत महत्त्वाचा माणूस. स्पार्ताकुसचा अगदी जवळचा माणूस. आणि मी त्याला चक्क मरताना पाहिले या इथे बसूनच. चार दिवस लागले त्याला. बैलासारखा बलवान होता तो. एखादा माणूस इतका शक्तिमान असू शकेल यावर तुमचा विश्वासच बसणार नाही. पण मी खरे सांगतो आहे. विश्वास ठेवा अगर ठेवू नका. तुम्हाला आश्चर्य वाटेल, इथले हे दृश्य बघायला शेकडो लोक आले होते. अर्थात ते दृश्यही तसे बघण्यासारखेच होते. तुम्हाला आश्चर्य वाटेल, स्पार्ताकुसबरोबर झालेल्या लढ्यांविषयी लोकांमध्ये प्रचंड अज्ञान होते. आता हेच पाहा ना - ही तरुण मुलगी मला विचारते आहे - 'हाच तो स्पार्ताकुस का?' अर्थात प्रश्न स्वाभाविक आहे. तुम्ही लोक सुरक्षित कवचात जगता. साहजिकच स्पार्ताकुसचे तुकडे-तुकडे झाले आणि त्याचे नखही नंतर कुणाला दिसले नाही, हे तुम्हाला माहीत नाही. हा जो फेअरत्राक्स आहे त्याचे तसे नाही. त्याला पकडण्यात आले. छोट्या-मोठ्या जखमा करण्यात आल्या.''

डोली वाहक आता त्याच्याकडे बघू लागले होते. त्याचे बोलणे ऐकू लागले होते. चेहरा झाकणाऱ्या त्यांच्या लांब केसामधून त्यांचे डोळे चमकू लागल्याचे दिसत होते.

जाड्या बोलतच होता. ''हा जो फेअरत्राक्स आहे, त्याने मरायला चार दिवस घेतले आणि त्यांनी त्याची नस कापून रक्तस्त्राव घडवून आणला नसता तर अजून काही दिवस त्याने काढले असते. तुम्हाला कदाचित माहीत नसेल पण क्रुसावर लटकवल्यानंतर नस कापावीच लागते. नाहीतर प्रेत एवढं फुगतं! रक्तस्त्राव जर नीट केला तर महिनाभर मृतदेह लटकून राहू शकतो. थोडासा वास येतो एवढेच. फेअरत्राक्स हिंस्त्र होता. बंडखोर आणि गर्विष्ठ होता. पण तो लढाई हरला. पहिल्या दिवशी जेव्हा त्याला इथे लटकवण्यात आले होते तेव्हा बघायला आलेल्या प्रत्येक सभ्य नागरिकाला उद्देशून त्याने शिव्याशाप दिले. तुमच्यासारख्या स्त्रियांनी ऐकू नये अशा भयानक घाणेरड्या भाषेत तो बोलत होता. शेवटी गुलाम हा गुलाम असतो. मी ते सगळे ऐकत होतो आणि वेळोवेळी त्याला सांगत होतो - 'तुझे दुर्दैव हे माझे सुदैव आहे व ज्या प्रकारे तू मरतो आहेस ती मृत्युची रीती सुखकारक नसेल पण तुझ्याविषयी माहिती देऊन पैसे कमावण्याची माझ्यावर आलेली वेळ ही काही आनंददायक गोष्ट नाही.' अर्थात या सगळ्या बोलण्याचा त्याच्यावर काही परिणाम होत नव्हता. दोन दिवसांनंतर तो मिटत-मिटत गेला. त्याचे शेवटचे शब्द काय होते सांगू का?''

''काय बोलला तो?'' कुजबुजत्या स्वरात क्लॉदियाने विचारले.

''तो म्हणाला, 'मी पुन्हा येईन, लक्षावधींच्या संख्येने येईन. एवढेच.''

''काय म्हणायचे होते त्याला?'' कायुसने विचारले. त्याच्या नकळतच त्याच्यावर हळूहळू जाड्याचा प्रभाव पडत चालला होता.

''त्या शब्दाचा अर्थ काय हे मी तरी कसे सांगू? ते शब्द काही त्यांनी पुन्हा उच्चारले नाहीत. दुसऱ्या दिवशी मी त्याला थोडं ढोसून पाहिले. पण एक शब्दही तो बोलला नाही. आपल्या लालभडक डोळ्यांनी माझ्याकडे बघत राहिला. जणू काही मला तो ठार मारणार होता. पण कुणालाही मारण्याची शक्ती आता त्याच्यात राहिली नव्हती.'' क्लॉदियाला उद्देशून जाड्या पुन्हा बोलू लागला.

''तर आता कळले ना, हा स्पार्ताकुस नव्हे. फक्त त्याच्या जवळचा एक माणूस. बळकट आणि निर्धारी. पण स्पार्ताकुसएवढा नव्हे. तो भारी होता. पण या हमरस्त्यावर तो तुम्हाला कुठेही दिसणार नाही. कारण तो कधीच मेलेला आहे आणि आता यावेळी त्याचे तुकडे इकडे तिकडे सडत असतील. आणखी काही जाणून घ्यायचे आहे?''

''आम्ही बरेच ऐकून घेतले आतापर्यंत.'' कायुस म्हणाला. इतका वेळ अकारण बडबड ऐकून घेण्याचा त्याला पश्चात्ताप झाला होता. ''आम्हाला गेले पाहिजे.''

◆◆◆◆

त्या काळात रोम म्हणजे जगाचे हृदयच होते. हृदय जसे रक्तवाहिन्यांद्वारे शरीराच्या सर्व भागात रक्ताचे अभिसरण घडवून आणते, तसेच रोमदेखील जगाच्या सर्व कानाकोपऱ्यापर्यंत आपल्या हमरस्त्यांमार्फत पसरलेले होते. रोमचे सगळेच वेगळे होते. रस्ता बांधण्याचा आदेश सिनेटने देण्याचा अवकाश की लगेचच कुशल तंत्रज्ञांचा ताफा कामाला लागायचा. अभियंते रस्त्याची आखणी करायचे, कंत्राटे दिली जायची आणि बांधकाम सुरू व्हायचे. मजुरांचे तांडे एखाद्या बाणासारखा रस्ता तयार करत जायचे. वाटेत पहाड लागला तरी तो छाटला जायचा. खोल दरी असेल तर त्याच्यावर ते पूल उभा करायचे, नदी असेल तर सेतू बांधायचे. रोमची वाटचाल कुणीही रोखू शकत नसते. रोमन रस्त्याला कुणीही अडथळा निर्माण करू शकत नसे.

कायुस, हेलेना आणि क्लॉदिया ज्या हमरस्त्यावरून निघाले होते, त्याचे नाव होते - आपिया हमरस्ता. हमरस्त्यावर दर पाच मैलांवर सार्वजनिक वसतिगृह आणि घोड्यांसाठी पागा होत्या. तिथे भाड्याने घोडेही मिळत. न्याहारीची व्यवस्था असे आणि आवश्यकता भासल्यास रात्री मुक्कामही ठोकता येत असे. या विश्रांतीस्थानांचे बांधकाम अतिशय नेटके आणि भव्य होते. काही ठिकाणी उत्तम स्नानगृहेही होती. नवी विश्रामगृहे ग्रीक मंदिराच्या धरतीवर बांधलेली होती आणि रस्त्यालगतच्या निसर्गसौंदर्यात त्यामुळे भर पडत असे. प्रत्येक हमरस्ता म्हणजे जणूकाही रोमच्या स्थैर्याचे एक मूर्तिमंत प्रतीक होते.

आणि आता या रस्त्यावर काही फुटांच्याअंतरावर क्रूस उभे केलेले होते आणि प्रत्येक क्रुसावर एक एक मृतदेह लटकत होता.

◆◆◆◆

कायुसचा अंदाज चुकला. त्याला वाटले होते तेवढी ती सकाळ शीतल नव्हती. उष्मा वाढत चालला होता आणि मृतदेहांचा सडका वास हळूहळू असह्य बनत चालला होता. त्याच्या सोबतच्या दोन्ही युवतींनी आपापल्या हातरुमालावर भरपूर अत्तर शिंपडले होते आणि सतत त्या रुमाल नाकाशी धरून होत्या. तरीही मृतदेहांचा दुर्गंध त्रासदायकच ठरत होता. कायुसलाही उन्मळून आले. अखेर त्यांनी एका विश्रामगृहात दुपारच्या जेवणासाठी थांबण्याचा निर्णय घेतला. सुदैवाने तेथून अर्ध्या मैलाच्या परिसरात क्रूस नव्हते. त्या भयानक वासाने त्यांची भूक मेली असली तरी, दुर्गंधीच्या त्रासापासून मात्र त्यांची या विश्रामगृहात आल्यावर सुटका झाली. ग्रीक धरतीचे बांधकाम असलेली एकमजली सुरेख वास्तू. त्वरित आल्हाद वाटावा अशी सुंदर ओसरी त्या विश्रामगृहाला होती. तिथे टेबले ठेवण्यात आलेली होती. जवळच झुळूझुळू वाहणारा ओढा होता आणि भोवताली सर्वत्र हिरव्याकंच सुगंधी पाईन वृक्षांची दाटी होती.

''काय सुंदर ठिकाण आहे हे!'' क्लॉदिया उद्गारली. कायुस याआधी येथे येऊन गेलेला होता. त्यामुळे झऱ्याचा आवाज मंजुळपणे कानत शिरेल एवढ्या अंतरावरचे टेबल शोधून काढण्यात त्याला अज़िबात अडचण आली नाही. तिथे स्थानापन्न होताच त्याने माहितगाराच्या अधिकारात विविध पदार्थ मागविण्यास सुरुवात केली. विश्रामगृहात एक खास प्रकारची वाईन जेवणाआधी दिली जायची. गडद लाल रंगाची रत्ने वितळली आहेत असे वाटावे तसा त्या वाईनचा रंग होता. एक-दोन घोट घेताच त्यांची भूक जागी झाली. ते बसले होते ते ठिकाण विश्रामगृहाच्या पिछाडीस होते. समोरच्या बाजूस मोठ्या दालनात सैनिक, किरकोळ व्यापारी आणि परदेशी मंडळी बसली होती. या इथे अधिक शीतल वाटत होते आणि सावल्याही गडद होत्या. या भागात फक्त खानदानी रईस आणि राणीने 'नाईट' किताब बहाल केलेल्या प्रतिष्ठितांना बसण्याची मुभा होती. मात्र हा विषय फारसा लावून धरला जात नसे. म्हणजे अन्य कोणी येऊन बसले तर त्यांना हटकले जात नव्हते. अलीकडे नाईट मंडळी खानदानी आचार-विचार शिकू लागली होती. त्यांच्या वागण्यातला भडकपणा बराच कमी होऊ लागला होता.

कायुसने विशिष्ट प्रकारे शिजवलेले चविष्ट बदक आणि संत्री मागविली. जेवण येईतोवर रोममधील एका नव्या नाटकावर त्यांची चर्चा सुरू झाली. नाटक विनोदी होते. पण हा विनोद ओढूनताणून आणलेला आहे आणि इतर अनेक नाटकांप्रमाणे कुठल्याही ग्रीक नाटकाची ते एक सुमार नक्कल आहे असा प्रकार होता. ''मला आवडले नाटक,'' कायुस म्हणाला.

तो बोलत असतानाच त्याला जाणीव झाली की आपल्या टेबलाजवळ कुणीतरी उभे आहे. इतर टेबले भरलेली होती. तो गृहस्थ व्यापारी असावा. त्यांच्या बाजूच्या रिकाम्या खुर्चीवर बसता येईल का, असा विचार तो करीत असावा. ''तुमची परवानगी असेल तर येथे बसून मी दोन घास खाऊन घेऊ का?'' त्याने विचारले. तो चांगला उंचनिंच होता. मजबूत हाडापेराचा आणि चांगल्या रीतीरिवाजात वाढलेला दिसत होता. त्याच्या महागड्या कपड्यांवरून त्याची श्रीमंतीही लक्षात येत होती. या तरुण मंडळींचे खानदान आणि प्रतिष्ठा एवढे सोडले तर त्यांच्यात फार काही अंतर नव्हते.

''माझे नाव गायुस मार्कुस सेनवियुस'', तो म्हणाला. ''तुमच्या संभाषणात खंड पडत असेल तर.....'' अत्यंत सौजन्याने तो म्हणाला.

''कृपया बसा'', हेलेना उत्तरली. कायुसने स्वत:ची, क्लॉदिया आणि हेलेनाची त्याला ओळख करून दिली. तो भारावल्याचे पाहून कायुस सुखावला.

''तुमच्या कुटुंबाबरोबर मी काही व्यवहार केल्याचे स्मरते.'' नाईट म्हणाला.

''व्यवहार?''

''हो. गुरांबाबतचा सौदा. मी सॉसेजचा उत्पादक आहे. माझा एक कारखाना रोममध्ये आणि दुसरा तारासिनामध्ये आहे. तिथूनच मी आता येतोय. तुम्ही जर आता येथे सॉसेज खाल्ले असतील तर ते आमच्याच कंपनीचे असणार.''

''हो नक्कीच'' कायुस म्हणाला. पण मनातून त्याचे वेगळेच विचारचक्र सुरू झाले होते. 'डुक्कर आहे साला. खरे तर तो माझ्यावर जळतो आहे. माझा तिरस्कार करतो आहे. पण तरीही निर्लज्जपणे आमच्याबरोबर बसला आहे.'

''हो, हो, मी डुक्करही विकत घेतो.'' कायुसचे विचार वाचल्यासारखा सेनवियुस अकस्मात म्हणाला.

''तुम्हाला भेटून आम्हाला अतिशय आनंद झाला.'' हेलेना सौजन्यपूर्वक म्हणाली. त्याच्याकडे पाहून तिने एक गोड स्मित केले. त्यानेही एका नव्या नजरेने तिच्याकडे पाहिले. जणू काही तो म्हणत होता, 'कळले बरे का. उच्चकुलीन असलीस तरी तू शेवटी एक स्त्री आहेस.' पण कायुसने आपल्या मनात एक वेगळाच अर्थ लावला. तो तिच्याकडे केवळ एक मादी म्हणून पाहातो आहे असे त्याला वाटत राहिले. त्याला ठार मारावे अशी एक ऊर्मी त्याच्या मनाला चाटून गेली. पण त्याच्यापेक्षाही स्वत:च्या बहिणीविषयी एक जबरदस्त तिरस्कार त्याच्या मनात दाटून आला.

''तुमच्या संभाषणात खंड पाडण्याचा माझा हेतू नव्हता.'' सेनवियुस अदबिने म्हणाला. ''चालू द्या तुमचे.''

''आम्ही एका कंटाळवाण्या नाटकाविषयी कंटाळवाणी चर्चा करीत होतो.'' हेलेनाने खुलासा केला.

इतक्यात जेवण आले आणि सगळे जण खाण्यात गुंतून गेले. अकस्मात क्लॉदियाने असे एक विधान केले ज्याच्याविषयी कायुसला नंतर सतत आश्चर्याचे धक्के बसत गेले.

''रस्त्यावर इतकी प्रतिके पाहून तुम्ही अस्वस्थ झाला असाल ना?''

''प्रतिके?''

''हो, हो. गुलामांना दिलेली प्रतिकात्मक शिक्षा. त्यांना क्रुसावर चढवणे.''

''अस्वस्थ?''

''हो, इतके ताजे मांस वाया गेले म्हणून...''

क्लॉदिया अत्यंत शांतपणे म्हणाली. तिच्या बोलण्यात चातुर्य नव्हते पण चीड आणणारा शांतपणा होता. हे वाक्य बोलून ती पुन्हा बदकाचा फडशा पाडत राहिली. आपल्या तोंडातून हसू बाहेर फुटू नये म्हणून कायुसला चेहरा ताणून राहावे लागले व सेनवियुस लालेलाल झाला. आपण काय बोललो आहोत हे न कळल्यामुळे क्लॉदिया खाण्यात गर्क राहिली. फक्त हेलेनाला थोडी शंका आली. सेनवियुस चांगले कडक प्रत्युत्तर देईल, काहीतरी खरमरीत बोलेल असे तिला वाटत राहिले आणि त्याचे पुढचे विधान ऐकताच तिला खरोखर आनंदही झाला.

''अस्वस्थ हा शब्द बरोबर नाही.'' सेनवियुस उत्तरला. ''खरे तर मला कुठलीही गोष्ट वाया गेलेली आवडत नाही.''

''वाया?'' क्लॉदियाने प्रतिप्रश्न केला.

त्याचवेळी हातातल्या संत्र्याचे छोटे छोटे तुकडे करून त्यातला एक तुकडा तिने अतिशय नाजूकपणे आपल्या ओठांमध्ये सरकवला.

''स्पार्ताकुसचे ते सैनिक चांगले धष्टपुष्ट होते.'' मार्कुस सेनवियुस खुलासा करीत म्हणाला. ''चांगले खाते-पिते असल्यामुळे प्रत्येकाचे सरासरी वजन दीडशे पाऊंड तरी असणार. सुमारे सहा हजार जणांना भुसा भरलेल्या पक्ष्यांसारखे क्रुसावर लटकवण्यात आले होते. म्हणजे नऊ लाख पाऊंड मांस झाले आणि ते नक्कीच ताजे असणार.''

'तो बोलतोय खरा, पण त्याला तसे काही अभिप्रेत नसणार.' हेलेना विचार करू लागली. आता पुढे संभाषणाला कोणते वळण लागणार या उत्सुकतेने तिचे संपूर्ण शरीर शहारून गेले. पण संत्र्याच्या फोडी चाखत असलेल्या क्लॉदियाला मात्र कळले होते की, तो तेच बोलतो आहे, जे त्याला म्हणायचे आहे. इतक्यात कायुसने विचारले -

''तुम्ही त्या मांसासाठी विचारणा का केली नाही?''

''विचारले ना मी!''

''पण मग ते विकायला तयार नव्हते की काय?''

''मी अडीच लाख पाऊंड मांस विकत घेण्यास यशस्वी ठरलो.''

त्याच्या बोलण्याचा हेतू काय आहे, ते कायुसला कळेना. त्याला वाटले की, तो आपल्याला मानसिक धक्का देऊ पाहातो आहे. क्लॉदिया जे बोलली त्याचा तो अशा घाणेरड्या रीतीने सूड घेऊ पाहातो आहे. हेलेनालाही तो बोलतोय त्यात तथ्यांश असावा असे वाटू लागले.

''माणसांचे मांस.'' क्लॉदिया कुजबुजली.

''गुलामांचे...'' सॉसेज उत्पादकाने खुलासा केला.

''मी छिलून त्यांचे तुकडे केले आणि मीठ मसाला घालून ते डुकराच्या मांसात मिसळून टाकले. त्यातले अर्धे गॉल देशात गेले. उरलेले इजिप्तला व अर्थात किंमतही पुरेपूर मिळाली.''

''मला वाटते तुमचा विनोद भरकटतो आहे.'' कायुस म्हणाला. सेनवियुसच्या तुलनेत तो बच्चा होता आणि त्याचा प्रगल्भ कडवटपणा पचविणे त्याला कठीण जात होते. नाईट किताब धारण करणारा सेनवियुस क्लॉदियाने केलेला अपमान उभ्या जन्मात विसरणे शक्य नव्हते. त्यावेळी तिथे उपस्थित असण्याचा गुन्हा कायुसने केलेला असल्यामुळे त्या प्रसंगाला तोच जबाबदार असल्याचे त्याचे मतही यापुढे कायम राहाणार होते.

''मी विनोद करत नाहीय.'' सेनवियुस अत्यंत रोखठोकपणे म्हणाला. ''या बाईसाहेबांनी एक प्रश्न विचारला होता आणि मी त्यांचे उत्तर दिलं. मी अडीच लाख पाऊंड वजनाचे गुलामांचे मांस विकत घेऊन त्याचे सॉसेजेस बनवले.''

''हा अत्यंत भयानक आणि किळसवाणा प्रकार आहे. मी जन्मात असे काही ऐकलेले नाही.'' हेलेना रागारागात बोलू लागली. ''मुळात तुम्ही मूर्ख आहातच, त्या मूर्खपणाला लागलेले हे विकृत वळण आहे.''

एका झटक्यासरशी सेनवियुस उठला. त्यांच्यापैकी प्रत्येकाकडे आळीपाळीने पाहात म्हणाला, ''माफ करा, मी निघतोय.'' नंतर कायुसकडे पाहात म्हणाला, ''तुमचे काका सिलियुस यांना विचारा. त्यांनी व्यवहार केला आणि त्यात स्वत:ही बऱ्यापैकी नफा उकळला.

एवढे बोलून तो झपाट्याने दूर निघून गेला. क्लॉदिया संत्र्याच्या फोडी खात राहिली. फक्त एक वाक्य बोलण्यापुरते मध्ये थांबली.

''हा म्हणजे अगदी अवलियाच निघाला.''

''ते काहीही असो. पण तो खरे बोलत होता एवढे नक्की.'' हेलेना म्हणाली.

''काय?''

''अर्थातच, त्यात एवढे आश्चर्य काय वाटायचे?''

''ती सगळी एक भाकडकथा होती.'' कायुस म्हणाला. ''केवळ आपल्याला बनवण्यासाठी तो धडधडीत खोटे बोलला.''

''हाच तर आपल्यामध्ये फरक आहे.'' हेलेना म्हणाली.

''कुणी खरे बोलत असेल तर ते मला बरोबर कळते.''

क्लॉदिया अधिकच गोरीमोरी झाली. रीतसरपणे त्यांची अनुमती घेऊन ती उठली आणि डौलदार राजस पावले टाकत विश्रांतीच्या खोलीकडे निघून गेली. हेलेना जणूकाही स्वत:शीच हसली.

''कुठल्याही गोष्टीचा तुला धक्का बसत नाही, हो की नाही हेलेना?'' कायुस म्हणाला.

''का बसावा?''

''अर्थात यापुढे मी कधीच सॉसेजेस खाणार नाही.''

'' मी तर ती कधीच खाल्ली नाहीत.'' हेलेना म्हणाली.

◆◆◆◆

विला सालारियाकडे जाणारा रस्ता आपिया हमरस्त्याइतकाच भक्कमपणे बांधलेला होता. पूर्वी या भागात दलदल होती. त्यात भराव टाकून ही जागा विकसित करण्यात आली होती. या सर्व जमिनीचा मालक अन्तोनियुस, हेलेना आणि कायुसचा चुलता होता. ही जागा तशी शहराच्या जवळ असल्यामुळे त्याविषयी त्या परिसरात सर्वत्र एक आकर्षण होते. तिथली झाडे वेळोवेळी फांद्या छाटल्यामुळे आटोपशीर वाटत होती आणि आपण रानात नसून बगिच्यात आहोत असा भास निर्माण होत होता. डोंगरांच्या कडाकडांनी जमीन समतल करून तिथे द्राक्षांचे मळे लावलेले होते. वसंत ऋतु असल्यामुळे वेलींना मोहर आलेला होता. ठिकठिकाणी बार्लीची शेते होती. आलिव्हची झाडे सर्वत्र दिसत होती. संध्याकाळ उतरत होती. सूर्य झपाट्याने टेकडीआड चालला होता. हवेत एक प्रसन्न गारवा निर्माण झाला होता आणि या अनुकूल वातावरणाला प्रतिसाद देत क्लॉदिया अधूनमधून आनंदाने चित्कारत होती. कायुस अंतर्मुख बनला होता. रस्त्यावरच्या हजारो क्रुसांच्या गोष्टी कानावर पडूनही क्लॉदियासारखी एक नाजूक आणि भावनाशील युवती आनंदाने अशी काही मोहरून जाऊ शकते याचे त्याला राहून राहून आश्चर्य वाटत होते.

अंतोनियुस खूप श्रीमंत होते. व्यापार धंदा करणे हे जुन्या खानदानी घराण्यांना वर्ज्य होते. पण अंतोनियुस क्रासुस यांना या निर्बंधांचा जाच कधीच झाला नाही. असे म्हणतात, की त्यांनी आपल्या दलालांमार्फत सुमारे दहा लाख 'सेस्तेर्सेस' (स्थानिक चलन) व्याजाने लावले होते. आणि त्याचे त्यांना शंभर टक्के व्याज मिळे. इजिप्तमधील व्यापारात त्यांचा अप्रत्यक्ष वाटा होता. तसेच स्पेनमध्ये चांदीच्या एका मोठ्या खाणीत ते भागीदार होते. अनेक बड्या कंपन्यांवरही त्यांचे अप्रत्यक्ष वर्चस्व होते. त्यांच्या श्रीमंतीचे मोजमाप करता येणे शक्य नव्हते. विला सालारिया हे त्यांचे निवासस्थान म्हणजे अभिरूची आणि सौंदर्य यांचा मिलापच होता. दहा हजार एकर शेत व वनजमीन या आलीशान वास्तूच्या आसपास पसरलेली होती. इतके असूनही ही काही तेथील सर्वातमोठी किंवा सर्वात विलोभनीय अशी मालमत्ता नव्हती. शिवाय अंतोनियुस क्रासुस यांनी कधीही आपल्या श्रीमंतीचे अवास्तव

प्रदर्शन केले नाही. खानदानी घराण्यांमध्ये अशा श्रीमंतीचे फार नवल असण्याचेही कारण नव्हते. अंतोनियुस स्वत: जुन्या जमान्यात अजूनही रममाण झालेले, प्रतिष्ठेच्या जुन्यापुराण्या कल्पनांना चिकटून असलेले रोमन नागरिक होते. कायुसला त्यांच्याविषयी आदर असला तरी खोलवर आपुलकी नव्हती. त्यांच्या उपस्थितीत त्याला सतत एक प्रकारची अस्वस्थता जाणवत असे.

कायुसभोवतालचे वातावरण वेगळे होते. रोमच्या सामाजिक जीवनात खानदानी तरुणांचा जो गोतावळा होता त्यापैकी बऱ्याच जणांना तरुण वयातच भरपूर पैसे कमावण्याच्या रोगाने ग्रासले असायचे. बरेच जण बेकायदेशीररित्या गुपचूप विविध व्यवसाय करायचे. काहींना प्रेमाचा रोग जडलेला होता. त्यांच्या बोलण्यात त्यांच्या मैत्रिणींची आकडेवारी असायची. काही राजकारणात बुडून गेलेले होते. मते विकणे, विकत घेणे, लाचलुचपत, निकाल निश्चिती यात ते पटाईत होते. काहीजण खाद्यपदार्थांचा व्यवसाय करायचे. लष्करात जाणारा क्वचितच एखादा निघायचा. कायुससारखा एखादा काही न करता बापकमाईवर ऐषोआरामाचे जीवन व्यतीत करायचा. कायुसच्या काकांना, अंतोनियुसना हे आवडणे शक्य नव्हते. त्यांच्या मते आदर्श रोमन तरुणाने लष्करात जावे, अधिकारपद मिळवावे, उत्तम संस्कार असलेल्या रोमन कुमारिकेशी यथासांग विवाह करावा, उत्तम कौटुंबिक जीवन जगावे, नि:स्वार्थीपणे देशाची सेवा करावी आणि उतारवयात राजदूत म्हणून नेमणूक झाल्यावर आमजनता तसेच धनिकांच्या अतीव आदराचे धनी व्हावे. याउलट 'जगा आणि जगू द्या' हे कायुसचे सूत्रबद्ध तत्त्वज्ञान होते व हे सूत्र जेथे पाळले जाई तो सुसंस्कृत समाज, असे त्याचे मत होते.

विला सालारियाच्या परिसरात पोहोचताना कायुसच्या मनात हे सगळे विचार येत होते. परिसर अत्यंत शांत होता. एक मोठा चौक आणि तलावाच्या भोवताली हे घर बांधण्यात आलेले होते. पांढऱ्या शुभ्र चुन्याच्या भिंतीवर लाल कौले होती. आसपास झाडी उभी होती. अर्थात ही सगळी अभिरूची अंतोनियुसची पत्नी जुलिया हिची होती आणि या सर्व बाबतीत अंतोनियुस आपल्या पत्नीच्या अध्यीवचनात होते. कायुसला स्वत:लाही खास अशी अभिरुची नव्हती आणि आपल्या काकांमध्येही ती त्याला कधी आढळली नाही.

घर जवळ येत चालले होते. अंतोनियुस क्रासुसच्या दोन छोट्या मुलींनी त्यांना सर्वप्रथम पाहिले आणि त्यांचे स्वागत करण्यासाठी त्या हिरवळीवरून धावतच पुढे झेपावल्या. त्या मागोमाग त्यांची आई अंतोनियुसची पत्नी – जुलिया हीदेखील उत्साहित होऊन पुढे आली. जुलिया प्रियदर्शनी होती. थोडी स्थूल. तिचा वर्णही अगदी गोऱ्यात मोडणारा नव्हता. काही क्षणांनंतर अंतोनियुस स्वत:ही घराच्या बाहेर आले. त्यांच्या बरोबर तीन पाहुणे होते. त्यांनी आपला पुतण्या आणि पुतणीचे स्वागत केले. नंतर लगेच औपचारिकपणे त्यांची पाहुण्यांशी ओळख करून दिली. त्यापैकी दोघांना कायुस ओळखत होता. लेन्तेलुस ग्राकुस हे एक धूर्त

आणि यशस्वी राजकारणी होते. शहरातल्या राजकारणावर त्यांचा वरचष्मा होता. दुसरे सद्गृहस्थ लिसिनियुस क्रासुस हे निवृत्त सेनापती होते. गुलामांबरोबर अलिकडे झालेल्या युद्धात त्यांनी बरेच नाव कमावले होते आणि किमान वर्षभर शहरात सर्वत्र त्यांचा बोलबाला होता. तिसरे गृहस्थ कायुसच्या ओळखीचे नव्हते. इतर दोघांपेक्षा ते तुलनेने तरुण होते.

त्यांच्या बोलण्यावागण्यावरून ते खानदानी घराण्यातील वाटत नव्हते. ते गर्विष्ठ होते आणि तो गर्विष्ठपणा बुद्धिवादी रोमन नागरिकाला शोभणारा अशा अंत:स्थ स्वरुपातला नव्हता. दिसायला ते बऱ्यापैकी होते. त्यांचे नाव होते मार्कुस तुलियुस सिसेरो. काकांनी त्यांची ओळख करून दिली तेव्हा कायुस तसा फार सूक्ष्म निरीक्षक नसला तरी सिसेरोचे अस्वस्थ कुतूहल त्याला पटकन जाणवले. तो आपला अंदाज घेत आहे, आपली पार्श्वभूमी, सांपत्तिक स्थिती आणि समाजातील प्रतिष्ठा याविषयी काही अटकळ बांधतो आहे, असे कायुसला जाणवले.

क्लॉदियाही यजमान आणि पाहुण्यांचे निरीक्षण करीत होती. राजकारण किंवा युद्ध या विषयांत तिला फारसे गम्य नसल्यामुळे ग्राकुस किंवा क्रासुस या दोघांमुळे ती फारशी भारून गेली नाही. सिसेरो हा तर पूर्ण अनोळखी होता. शिवाय धनपिपासू नाईट्सच्या परंपरेतील होता. अशा लोकांचा द्वेष करायला तिला शिकवण्यात आले होते. त्यामुळे राहाता राहिले अंतोनियुस क्रासुस. या अतिभव्य हवेलीचा आणि अफाट मालमत्तेचा मालक. क्लॉदियाने धूर्तपणे त्यांचे निरीक्षण सुरू ठेवले होते. गरुडाच्या चोचीसारखे बाकदार नाक असलेला पीळदार स्नायूंचा हा जमीनमालक वरवर जरी परंपरानिष्ठ आणि कर्मठ वाटला तरी त्याच्या या स्वभावाला भावनिकतेची एक झालर आहे हे क्लॉदियाने ओळखले. अनेक अतृप्त भुका आणि खोलवर गाडून टाकलेल्या अनेक इच्छा-आकांक्षा या माणसापाशी आहेत हेही तिला जाणवले. वजनदार असलेली निरुपद्रवी माणसे तिला आवडत. अंतोनियुस क्रासुस कधीच त्रासदायक ठरणार नाही किंवा कुठलीही गुपिते कधीच फोडणार नाही याची तिला जाणीव पटली. अंतोनियुसकडे अधूनमधून कटाक्ष टाकत, त्याच्या दिशेने एक समंजस मूक स्मित हास्य सांडत ती त्याला आपल्या भावना जाणवून देत होती.

बोलता बोलता मंडळी घरात येऊन पोहोचली. कायुस कधीचाच घोड्यावरून उतरला होता. एका इजिप्शीयन गुलामाने त्याचा घोडा लगाम पकडून पागेच्या दिशेने नेला. डोलीवाहक थकून गेले होते. घामाने निथळत होते. आपापल्या सामानाजवळ मुटकुळ्या करून ते बसले होते. संध्याकालीन गारठ्याने ते कुडकुडत होते. त्यांच्यामध्ये विशीच्या आतला एक नवयुवकही होता. थकावट, गारठा, भूक या सगळ्यांमुळे तो हुंदके देत होता. पण त्याच्याकडे कोणी लक्ष दिले नाही. वीसएक मिनिटांनंतर एक गुलाम येऊन त्यांना नोकरांच्या बराकीकडे घेऊन गेला. तिथे त्यांना रात्रीचे जेवण आणि निवारा मिळणार होता.

◆◆◆◆

लिसिनियुस क्रासुस आणि कायुस या दोघांनी मिळून एक स्नानगृह निवडले. कायुसच्या लक्षात आले की, आजकालच्या तरुणांच्या प्रत्येक बऱ्यावाईट सवयींवर टीकेचे प्रहार करणाऱ्या ज्येष्ठांपैकी हा माणूस नाही. क्रासुस मनमिळावू आणि प्रसन्न होता. समोरचा माणूस फारसा महत्त्वाचा नसला तरी त्याचे मत जाणून घेऊन त्यालाही विश्वासात घेण्याची कला त्याच्याकडे होती. गरम पाण्याच्या तलावात ते डुंबत होते. पाण्यात सुगंधी द्रव्ये टाकलेली होती. आणि दोघांची शरीरे उबदार बनत चाललेली होती. क्रासुस जरी मध्यमवयीन असला तरी त्याचे शरीर कमावलेले होते. तारुण्य ओसरलेले नव्हते आणि तो सतत दक्ष वाटायचा. ''तुम्ही रोमवरून आलात का?'' असा प्रश्न करून त्याने संभाषण सुरू केले.

''हो, आणि उद्या कापुआला चाललो आहोत.''

''वाटेत तुम्हाला क्रूस दिसले की नाही? काही त्रास तर झाला नाही?''

''आम्हाला ते बघण्याची उत्सुकता होतीच.'' कायुस म्हणाला. ''आणि खरे सांगायचे तर तसा आम्हाला त्रास वगैरे काही झाला नाही. एखाददुसऱ्या ठिकाणी एखादा मृतदेह पक्ष्यांनी चोची मारून फोडलेला दिसला. अशावेळी वारा आपल्या दिशेने वाहात असला तर दुर्गंधीमुळे अस्वस्थ व्हायला होते. पण त्याला काही इलाज नसतो. बरोबरच्या दोघीजणी सरळ डोलीचा पडदा ओढून घ्यायच्या. पण डोली वाहकांवर थोडाफार परिणाम झाला. त्यांची चाल मंदावली.''

''क्रुसावर आहेत तेही गुलामच आहेत हे जाणवून डोलीवाहक भेदरले असावेत.'' जनरल क्रासुस म्हणाले. त्यांच्या चेहऱ्यावर एक वेगळेच स्मित झळकत होते.

''शक्य आहे. पण अशाप्रकारची काही भावना, अस्वस्थता वगैरे गुलामांमध्ये निर्माण होऊ शकते असे तुम्हाला वाटते का? आमचे डोलीवाहत प्रशिक्षित आहेत. लहानपणीच मुंदेलियुसच्या गुलाम प्रशिक्षण शाळेत चाबकाने फोडून त्यांना तयार करण्यात आले आहे. ते शक्तिमान आहेत. परंतु पाळीव प्राण्यांपेक्षा वेगळे नाहीत. क्रुसावरच्या गुलामांशी तद्रुपता साधण्याइतपत ते पुढे गेलेले नाहीत. गुलामांमध्ये काही समान गुण वगैरे असतात, असे मला वाटत नाही. पण त्याबाबतीत तुम्ही अधिक जाणकार आहात. स्पार्टाकुसविषयी त्यांना कळवळा किंवा दु:ख वाटले असेल असे तुम्हाला वाटते का?''

''बहुतेकांना ही तद्रुपता जाणवली असावी, असे मला वाटते.''

''खरेच? ही बेचैन करणारी गोष्ट आहे मग.''

''तसे नसते तर क्रुसावर लटकावण्याचा हा उपद्व्याप करायला मला आवडले नसते.'' मुद्दा स्पष्ट करीत क्रासुस म्हणाले. ''ते वायफळ ठरले असते. कुठलीही गोष्ट अकारण करून वाया घालवणे मला आवडत नाही. शिवाय मोठ्या प्रमाणातील हत्या आपल्यावर उलटू शकतात. सामूहिक हल्ल्यामुळे कालांतराने आपल्यालाच इजा होऊ शकते.''

''पण गुलाम आपल्याला काय करणार?'' कायुसने निषेध नोंदवला.

''सिसेरोने हे फार छान मांडले आहे. गुलाम, जनावर आणि वस्तू यात फरक काय? सिसेरो म्हणतो, 'गुलाम म्हणजे भाषा माहीत असलेले साधन, प्राणी म्हणजे फक्त आवाज काढणारे साधन तर सर्वसामान्य वस्तू हे मूक साधन असते. सिसेरो अतिशय हुशार माणूस आहे आणि त्याने चातुर्याने हा फरक मांडला आहे. सिसेरो हुशार आहे हे खरे पण त्याला काही स्पार्ताकुसबरोबर लढाई करावी लागली नाही. मी जशा रात्री बेरात्री जागून काढल्या, स्पार्ताकुस काय करीत असेल, या बंडामागचे त्याचे तर्कशास्त्र काय असेल, याचा अंदाज घेण्यात दिवस दिवस घालवले तसे काहीही सिसेरोला करावे लागले नाही. मी गुलामांशी युद्ध केले. त्यामुळेच एक दिवस अकस्मात माझ्या लक्षात आले की, गुलाम भाषा जाणणारे साधन आहेत एवढ्यापुरताच विचार करून चालणार नाही. गुलामांमध्ये या व्याख्येत न सामावणारे असे बरेच काही आहे.''

''तुम्ही त्याला ओळखत होता, व्यक्तिश:?''

''कुणाला?''

''स्पार्ताकुसला.''

विचारात गढून गेलेल्या जनरलच्या चेहऱ्यावर एक स्मित झळकले. 'प्रत्यक्ष नाही' एक एक शब्द मोजून मापून ते म्हणाले, ''इकडच्या तिकडच्या ऐकीव गोष्टी एकत्र करून मी त्याच्याबद्दलचे एक चित्र माझ्या मनात रेखाटले. पण त्याला नीट ओळखणारे कुणी असेल असे मला वाटत नाही. त्याला कुणी कसे ओळखू शकेल? तुमचा पाळीव कुत्रा अकस्मात वेडसर झाला व वेड्यासारखाच पण हुशारीने वागू लागला तरी तो कुत्राच असतो नाही का? स्पार्ताकुसचे एक मानसिक चित्र मी तयार केले. पण त्याच्यावरून त्याचे हुबेहूब रेखाटन होणार नाही. अन्य कुणी तसे काढू शकेल असेही मला वाटत नाही. ज्यांनी त्याला पाहिलेले होते त्यांचे मृतदेह आपिया हमरस्त्यावर लटकत आहेत व स्वत:च स्पार्ताकुस एखाद्या स्वप्नासारखा हवेत विरून गेला.''

हा विषय लावून धरणे कायुसला कठीण होत होते. त्याला स्वत:ला युद्धाचा अनुभव अत्यल्प होता आणि खरे तर लढाया वगैरे मारण्यात स्वारस्यही नव्हते. तरीही क्रासुस त्याच्याशी नम्रपणे आणि सहानुभूतीने वागत होता. कदाचित रोमन इतिहासातील सर्वात मोठी लढाई जिंकलेल्या या जनरलला आता शांततेची आणि मित्रांची गरज भासत असेल. ते स्नानगृहाच्या बाहेर आले तेव्हा गुलाम स्त्रिया त्यांच्यासाठी मोठमोठे उबदार टॉवेल घेऊन उभ्या होत्या.

''मला अशा प्रकारे स्त्रियांकडून कपडे घालून घेण्याची सवय नाही.'' क्रासुस म्हणाले, ''तुला हे आवडते का?''

''मी काही त्यावर फारसा विचार केलेला नाही.'' कायुसने वरवर उत्तर दिले पण ते पूर्णपणे खरे नव्हते. गुलाम स्त्रियांकडून स्वत:ला हाताळून घेण्यात एक निश्चित आनंद आणि उत्तेजना असते हे त्याला माहीत होते. त्याचे वडील त्याला असा आनंद घेऊ देत नव्हते. कदाचित त्यामुळेच गुलामांबद्दलचा त्यांचा दृष्टिकोन बदलला नव्हता. कायुस आणि त्याचे बरेच मित्र अजूनही जुन्या प्रभावामुळे त्यांच्याकडे माणूस म्हणून बघायला शिकलेले नव्हते.

जनरलच्या प्रश्नामुळे कायुसने प्रथमच त्या तीन गुलाम स्त्रियांकडे पाहिले. स्पेनच्या एखाद्या दूरच्या भागातील जमातीपैंकी त्या असाव्यात. तिघीही लहानखुऱ्या आणि तरुण होत्या. अनवाणी पावलांनी त्या उभ्या होत्या. त्यांचे आखूड पोषाख गरम पाण्याच्या वाफेमुळे ओले झाले होते. क्रासुसने तीनपैकी एकीला धसमुसळेपणाने जवळ ओढले. तिने प्रतिकार केला नाही पण तिची नाखुषी स्पष्टपणे दिसून येत होती.

या सर्व प्रकारामुळे कायुस नाराज झाला. एका क्षुल्लक गुलाम स्त्रीभोवती घिरट्या घालणाऱ्या जनरलविषयी त्याच्या मनात एक तीव्र तिरस्कार दाटून आला. जनरलच्या या स्वच्छंद प्रणयामुळे आपली प्रतिष्ठा कमी होत आहे असेही त्याला वाटू लागले.

त्या गुलाम स्त्रीबरोबरची मस्ती आटोपून जनरल अंग पुसण्याच्या दालनाकडे निघाले. कायुसही त्याच्या पाठोपाठ चालू लागला. जणू काहीच न घडल्यासारखे जनरलने स्पार्ताकुसविषयक संभाषणाचा धागा पुढे चालू ठेवला. ''मी तर त्याचे एक मानसिक चित्र काढलेलेच होते. पण त्याच्या मनात माझ्याविषयी काय असेल याचेही मला कुतूहल आहे.'' आपल्या विचारांना वाट करून देत क्रासुस म्हणाले.

''अगदी अखेरच्या क्षणी त्याने माझे नाव घेतले होते, असे म्हणतात. अर्थात मी स्वत: काही ते ऐकले नाही. पण असे म्हणतात, की लढाईच्या अगदी शेवटच्या टप्प्यात स्पार्ताकुस त्वेषाने म्हणाला, ''क्रासुस हरामखोरा, थांब जरा मी येतोय. तो माझ्यापासून अवघ्या चाळीस पन्नास यार्डावर असावा. प्रचंड त्वेषाने तो ते अंतर कापत येऊ लागला. अतिशय विस्मयजनक अशी ती गोष्ट होती. तो काही फार अवाढव्य माणूस नव्हता. पण त्वेषाने पेटून उठलेला होता. अनावर संतापाने त्याने निम्मे अंतर कापले. त्या भाऊगर्दीत किमान दहा-अकरा सैनिकांना त्याने कंठस्नान घातले असावे. आणि आम्ही सगळ्यांनी मिळून त्याचे तुकडे तुकडे करीपर्यंत त्याचा त्वेष ओसरलेला नव्हता.''

''त्याचा मृतदेह सापडला नाही हे खरे आहे का?'' कायुसने त्याच्या मनात घर करून असलेला प्रश्न विचारला.

''बरोबर, त्याचे तुकडे तुकडे झाले आणि ओळख पटण्यासारखे काहीही शिल्लक राहिले नाही. रणांगण कसे असते, तुला माहीत आहे का? सगळीकडे मांसाचे ढिगारे आणि रक्ताचा सडा पडलेला असतो. कुठले मांस कोणाचे आणि कुठले रक्त कुणाचे हे कळणे कठीण

असते. जसा तो आला तसाच गेला. अज्ञातातून आला आणि अज्ञातात निघून गेला. एखादा प्राणी झुंजीच्या रिंगणातून खाटकाच्या दुकानात पोहचावा तसा. आम्ही सैनिक तलवारीसह जगतो अणि तलवारीच्या साक्षीनेच मरतो. स्पार्ताकुस असाच होता. माझा त्याला सलाम.''

''तुम्हाला त्याचा तिरस्कार वाटत नाही का?''

''कशासाठी, तो एक चांगला सैनिक होता आणि दुष्ट, ओंगळ गुलाम होता. त्याचा मी विशेष तिरस्कार का म्हणून करावा? तो मेलाय् आणि मी जिवंत आहे.''

◆◆◆◆

विला सालारियामधील रात्रीचे भोजन अनेक गोष्टींमुळे वैशिष्ट्यपूर्ण ठरले. तेथील रीतीरिवाज जुन्या वळणाचे होते. त्याचे एक कारण म्हणजे अंतोनियुस क्रासुस स्वत:ला व्यापाऱ्यांच्या नवश्रीमंत समूहापासून वेगळा समजायचा. युद्ध, चोरटी मालवाहतुक, खनिकर्म आणि व्यापारातून रग्गड पैसा मिळवलेले हे व्यापारी ग्रीस किंवा ईजिप्तमध्ये आलेल्या प्रत्येक नव्या गोष्टीचे अनुकरण करीत. टेबलावर बसून एकत्र जेवण्यापेक्षा हे लोक विविध खाद्यपदार्थ एका ठिकाणी मांडून ठेवत असत आणि प्रत्येकाने तिथे जाऊन हवे ते घ्यायचे अशी त्यांची पद्धत होती. अंतोनियुसला हे आवडत नसे. त्यामुळे त्याने पाहुण्यांसाठी एका अतिभव्य टेबलावर भोजनव्यवस्था केलेली होती. तिथे जाऊन एकत्र बसून सर्वांनी एकमेकांच्या सहवासात भोजन करायचे. मेजवानीच्या वेळी संगीत किंवा नृत्याचा घोळ घालणेही त्याला आवडत नसे. उत्तम खाद्यपदार्थ, उत्तम मद्य आणि उत्तम संभाषण ही विला सालारियाची परंपरा होती. आजच्या भोजनालाही पाळीव व हिंस्त्र जंगली जनावरांचे मांस, उत्कृष्ट सूप, उत्तमोत्तम फळे असा सगळा सरंजाम होता. स्वत: अंतोनियुस ग्रीक इतिहास, तत्वज्ञान, नाट्य, वैद्यकशास्त्र, राज्यशास्त्र आदी बहुविध विषयांमध्ये आपला अधिकार आहे, असे मानायचा. त्याच्या पाहुण्यांनाही उत्तम वाईन घेताना आणि स्वादिष्ट खाद्यपदार्थांचा आस्वाद घेताना आपोआपच त्याच्या अभिरूचीचा साक्षात्कार व्हायचा.

कायुस सर्वांचे निरीक्षण करीत होता. सिसेरोच्या चेहऱ्यावर सततच एक मंद स्मित झळकताना त्याला दिसले. सिसेरोच्या व्यक्तिमत्वामुळे कायुस अस्वस्थ झाला. हा सिसेरो लोकांना कसा काय आवडता कुणास ठाऊक. त्याला प्रश्न पडला. फक्त एकदाच सिसेरोने त्याच्याकडे कटाक्ष टाकला होता. त्या नजरेत त्याने त्याचे सर्वस्व ओळखल्याचा भाव होता. खरेच का तो मनकवडा होता, म्हणून का त्याला लोक घाबरायचे? पुन्हा एकदा प्रश्नाचा भुंगा त्याचा जीव पोखरू लागला. या माणसापासून दूर राहिले पाहिजे असे त्याने स्वत:ला बजावले. क्रासुस एक विशिष्ट आदर राखून संभाषणात सहभागी होत होता. त्याला आदबशीर राहणे भागच होते. रोमन सैनिकाची तो मूर्तीमंत प्रतिकृती होता. चौकोनी चेहऱ्याचा, ताठ, मजबूत बांध्याचा, कास्य त्वचेचा. तो तसाच असणे भाग होते. ग्राकुस उंचपुरा होता. मोठ्याने

आवाज काढत तो बोलायचा. चरबीच्या वळ्यांमध्ये त्याचा चेहरा बुडून गेला होता. त्याच्या प्रचंड मांसल हातात, प्रत्येक बोटात एकेक अंगठी होती. व्यावसायिक राजकारण्याच्या सराईत पद्धतीने तो वागायचा. त्याचे हसणे बुलंद होते. त्याचे कौतुक दिपवून टाकणारे होते. मतभेद मात्र सशर्त असत. त्याची विधाने बडेजावपूर्ण असली तरी मूर्खपणाची नसत.

संभाषण रंगात आले होते. सिसेरो म्हणाला - ''अर्थातच गुलामांच्या हातात नांगर दिला तर अधिक चांगले काम होईल.'' ग्राकुसने या विधानाबाबत अविश्वास प्रकट करताच सिसेरोने लगेच स्पष्टीकरण दिले.

''विचार करू शकणारे जनावर विचार करू न शकणाऱ्या जनावरापेक्षा अधिक चांगले नाही काय? शिवाय बैलाऐवजी नांगराला घोडा जुंपणे मूर्खपणाचे ठरेल कारण तो मौल्यवान प्राणी आहे.''

''आपण फक्त गुलामांविषयी बोलणार आहोत का?'' अंतोनियुसने सिसेरोला छेडले.

''का नाही? आपण गुलाम आणि गुलामगिरीच्या व्यवस्थेतून निर्माण झालो आहोत. खोलातच शिरायचे झाले तर असे म्हणता येईल, की या व्यवस्थेनेच आपल्याला रोमन बनविले आहे. आपल्या यजमानांची ही जी प्रचंड शेतीवाडी आहे ती हजारभर गुलामांच्या कृपेवरच उभी आहे. हा जो क्रासुस आज रोममध्ये सर्वत्र चर्चेचा विषय झालेला आहे, तो केवळ गुलामांच्या बंडाचा बिमोड केल्यामुळेच आणि हा ग्राकुस गुलामांच्या बाजारातून पैसे मिळवतो.'' नंतर कायुसकडे वळून पाहात आणि एक स्मित त्याच्या दिशेने फेकत सिसेरो म्हणाला - ''हा नवतरुणसुद्धा गुलामांच्या व्यवस्थेचेच फळ आहे. माझी खात्री आहे, लहानपणी त्यांनीच त्याची काळजी घेतली असणार, त्याला भरवले असणार, खेळवले असणार....''

कायुस गोरामोरा झाला. पण ग्राकुस स्फोट झाल्याप्रमाणे मोठ्यांदा हसला आणि म्हणाला.. ''तुझ्या बाबतीत काय, सिसेरो?''

''मला बऱ्याच अडचणी आहेत. आजकाल रोममध्ये नीट राहायचे असेल तर किमान दहा गुलाम लागतात. त्यांना विकत घ्यायचे म्हणजे खायला प्यायला दिले पाहिजे. राहायची सोय केली पाहिजे आणि तीच तर माझी अडचण आहे.''

ग्राकुस हसतच राहिला. पण क्रासुस म्हणाला, ''गुलामांमुळेच आपण रोमन बनतो हे तुझे म्हणणे मला मान्य नाही सिसेरो.'' ग्राकुसचे हास्य अखंड प्रकटतच राहिले.

सिसेरो म्हणाला - ''आपल्या आसपास पाहा.'' तो हे म्हणत असतानाच एक गुलाम रिकामे प्याले उचलून भरलेले प्याले ठेवत होता. दुसरा एक गुलाम पाहुण्यांना फळे आणि सुकामेवा देत होता. ''आपल्या जीवनाचे सार-तत्व काय आहे? आपण सामान्य माणसे नाही आहोत. आपण रोमन आहोत आणि गुलामांचा पूर्ण वापर करून घेण्याची अक्कल असलेले आपण पहिले आहोत.''

''पण रोम अस्तित्वात येण्याआधीही गुलाम होतेच.'' अंतोनियुसने आपला आक्षेप नोंदवला.

''हो ना, ग्रीकांकडेही लागवडी होत्या. कार्थेजमध्येही शेतीवाडी होतीच. पण आपण ग्रीक साम्राज्य नष्ट केले. कार्थेज नष्ट केले. आपल्या लागवडींना जागा करून देण्यासाठी. जी गोष्ट इतर लोक एका गुलामात भागवतात ती करण्यासाठी आपल्याला तीस गुलाम लागतात. या संस्कृतीची सर्वात मोठी फलनिष्पत्ती म्हणजे स्पार्ताकुस. क्रासुस तुम्हाला काय वाटते. तुमचा तर स्पार्ताकुसशी निकटचा परिचय होता. रोमशिवाय अन्य कुठल्याही देशात स्पार्ताकुस जन्माला येऊ शकला असता का?''

''स्पार्ताकुसला आपण जन्माला घातले?'' क्रासुसने आश्चर्य व्यक्त केले. जनरल अस्वस्थ झाले होते. फार विचार करणे त्यांना त्रासदायक वाटत असावे, अशी अटकळ कायुसने बांधली. त्यात सिसेरोसारख्या हुशार माणसाला तोंड द्यायचे म्हणजे कठीणच. ''मला वाटले की, स्पार्ताकुसचा जन्म नरकात झाला असावा.'' क्रासुसने आपल्या भावनांना वाट करून दिली.

''चुकीचे आहे ते.'' सिसेरो पटकन म्हणाला.

ग्राकुस शांत होता. वाईनचे प्याल्यावर प्याले रिचवत होता. रोमन असूनही तो तत्वज्ञ म्हणून कच्चाच होता. त्याला रोमचे वैभव दिसत होते. गुलामही दिसत होते. पण या दोहोंची सांधेजोड सिसेरो कशासाठी करीत आहे, हे काही केल्या त्याच्या लक्षात येत नव्हते.

''समजून घ्या.'' सिसेरो म्हणाला.

''कशासाठी?'' अंतोनियुसने पृच्छा केली. क्रासुस मोठ्याने हसला आणि त्याने कायुसकडे एक कटाक्ष टाकला. कायुस थरारला. उत्तेजनेचा एक तरंग त्याच्या कण्यातून खालपर्यंत पसरत गेला. क्रासुस भरपूर मद्यपान करीत होता. पण मग ते पाहून कायुसची वाईनवरची वासनाच निघून गेली. कायुसने हळूच तिथून काढता पाय घेतला आणि तो शयनकक्षात जाऊन विसावला. बऱ्याच वेळाने जनरल क्रासुसही विसाव्यासाठी त्या खोलीत आले. कायुसच्या डोक्यातून अजूनही स्पार्ताकुसचा विषय पूर्णतया गेलेला नव्हता. साहजिकच त्याने जनरल क्रासुस यांना स्पार्ताकुसविषयी काहीतरी सांगण्याचा आग्रह धरला. अखेर जनरलनी ती विमनस्क करणारी कहाणी सांगायला सुरुवात केली.

◆◆◆◆

# २. मृत्यूच्या दाढेतले गुलाम

''जनरल पदाची सूत्रे माझ्या हाती देण्यात आली तेव्हा गुलामांच्या फौजांनी आमच्या सैनिकांचा पार भुगा करून टाकला होता. इटलीवर त्यांनी आपला ताबाच प्रस्थापित केला होता. मला देण्यात आलेले पद म्हणजे एक प्रकारे लवकरात लवकर स्मशानात पोहोचण्याची सोय होती. राज्यकर्ते मला म्हणाले या संकटातून मार्ग काढा. मोहिमेवर निघा आणि गुलामांचा पराभव करा. त्या मोहिमेची सूत्रे हाती आल्यामुळे माझे शत्रूदेखील मला मान द्यायला लागले होते. मी फौजा घेऊन निघालो. सिस-अल्पाईन गॉल परिसरात आमच्या फौजांनी तंबू ठोकले होते. त्यावेळी लेन्तुलुस बातियातुस या तुझ्या विशालकाय मित्रास मी बोलावून घेतले.''

जनरल क्रासुस यांच्या कँपकडे लेन्तुलुस निघाला तेव्हा झुरमुर पाऊस पडत होता. सर्व सृष्टी केविलवाणी वाटत होती. एका किडकिडीत पिवळ्या घोड्यावर बसून लेन्तेलुसने कापुआ-हून मजल दरमजल केल्यामुळे तो अपार थकला होता. त्यातच वाटेत दोन सैनिकांनी अडवले.

''हा रस्ता कॅम्पकडे जातो ना?''

''हो.'' ते म्हणाले.

''मी तिथेच चाललो आहे.''

''कशासाठी?''

''कमांडरनी मला बोलावले आहे.''

त्याने खिशातून क्रासुस यांचा आदेश काढून त्यांना दाखवला. त्यानंतर त्याची वाट मोकळी झाली. जनरल क्रासुस यांचा मुक्काम असलेल्या परिसरात पोहोचताच एका तरुण अधिकाऱ्याने त्यांना थांबवले. त्याने आपले नाव घेता सर्वकाही माहिती असल्याप्रमाणे ऐन विशीतला तो तरुण अधिकारी ओळख दाखविल्यासारखा हसला आणि म्हणाला, ''कमांडर तुमची वाट पाहात आहेत. मी तुम्हाला त्यांच्याकडे घेऊन जातो.''

लष्कराच्या त्या डेऱ्यातील वेड्यावाकड्या रस्त्यातून वाट काढत अखेर ते मुख्य तंबूपाशी पोहोचले. तिथेच एक चाळीस फूट लांब व वीस फूट रुंदीची बांधीव खोली होती. एक भव्य लाकडी टेबल आणि त्याभोवती डझनभर स्टुले ठेवलेली असा त्या खोलीचा खाक्या होता. टेबलाच्या एका कोपऱ्यात हाताचे दोन्ही कोपर टेकवून समोरचा नकाशा न्याहाळत बसले होते - कमांडर इन-चीफ मार्कुस लिसिनियुस क्रासुस. लेन्तुलुस आत येताच जनरल उठून चालत पुढे आले आणि त्यांनी त्याच्याशी हस्तांदोलन केले. ''कापुआचे लेन्तुलुस बातियातुस ते आपणच ना?'' त्यांनी विचारले. बातियातुसने होकारार्थी मान हलवली.

''एवढ्या लांबवरून तुम्ही आलात. भिजला असाल, थकून गेला असाल आणि तुम्हाला भूकही लागली असेल.'' काळजीच्या स्वरात जनरल म्हणाले.

''हो ना, एकवेळ मी आंघोळ उशिराने करेन पण मला काहीतरी खायला द्या बुवा!'' बातियातुस प्रांजळपणे म्हणाला. स्मितहास्य करीत सोबतचा तरुण अधिकारी खाण्या-पिण्याची व्यवस्था लावण्यासाठी निघून गेला. काही काळाने बातियातुससमोर उकडलेली अंडी, मासे, चिकन, वाईनचा प्याला अशी सामग्री होती. यथेच्छ खाणे सुरू झाले.

क्रासुस त्याच्याकडे कुतूहलाने पाहात होता. त्याच्या पिढीचे आणि दर्जाचे रोमन नागरिक बातियातुससारख्या व्यापाऱ्याकडे एका कुत्सित नजरेने पाहायचे. अशा कमअस्सल लोकांचा द्वेष करायला परंपरेने क्रासुसना शिकवले होते. रोमन धनवंतांची आवडती करमणूक म्हणजे ग्लॅडिएटर्सची झुंज (कट्यार-तलवार आदी शस्त्राने खेळलेले द्वंद्वयुद्ध). अशा झुंजीसाठी चिवट गुलाम निवडले जायचे. त्यांना प्रशिक्षण दिले जायचे. बातियातुससारखे दलाल अशा गुलामांची विक्री करीत किंवा झुंजीसाठी गुलाम भाड्याने देत. गेल्या वीस वर्षांत संपूर्ण रोम साम्राज्यात या दलालांनी मजबूत पैसा कमावला होता आणि अर्थातच राजकीय वजनही त्यांन प्राप्त झाले होते. बातियातुस अशांपैकीच एक होता. रोममध्ये सर्वत्र अशा झुंजीसाठी मंच उभारलेले होते. काही ठिकाणी लाकडी मंच होते. त्यावर महिनोन्महिने शेकडो जोड्यांचे द्वंद्व युद्ध सुरू असायचे. बातियातुसची एकूण खाण्याची पद्धत व त्याचे जनावरसदृश्य वर्तन यामुळे एकप्रकारचा वैताग येऊनही जनरलनी चेहऱ्यावर न दाखवता संभाषण सुरू केले.

''मला तुमच्याकडून थोडी माहिती पाहिजे आहे.''

''कोणती?''

''माझा शत्रू - स्पार्ताकुसची स्वभाववैशिष्ट्ये तुम्हाला ठाऊक असतील.''

''स्पार्ताकुस स्वभावाने शांत आहे. जवळजवळ विनम्रच म्हणा ना आणि वंशाने तो थ्रासियन आहे.'' वाईनचा एक घुटका घेत बातियातुस बोलू लागला.

''तो भव्य नि उंचापुरा आहे, अशी उगीचच हवा पसरलेली आहे. खरे तर तो फारसा उंचही नाही. मध्यम बांध्याचा आणि तुमच्या एवढाच उंचीचा आहे. काळे कुरळे केस आणि गडद तपकिरी डोळे. त्याचे नाक फुटलेले नसते तर कुणीही त्याला देखणाच म्हटले असते. पण फुटलेल्या नाकामुळे त्याच्या रुंद चेहऱ्यावर शेळी-बकरीसारखा एक केविलवाणा भाव पसरलेला असतो. पण अर्थातच हा केविलवाणेपणा वरवरचा आणि फसवा आहे. त्याने जे केले ते अन्य कुणीही केले असते तर मी त्याला ठारच मारले असते.''

''काय केले त्याने?'' क्रासुसनी विचारले.

''अं....''

''तुम्ही अगदी खरेखुरे बोला कारण मला स्पार्ताकुसविषयी अगदी खरीखुरी माहिती हवी आहे.'' क्रासुसनी आपल्या हेतूची स्पष्ट शब्दात जाणीव करून दिली. ''मला त्याची संपूर्ण पार्श्वभूमी सांगा. त्याला तुम्ही कुठे विकत घेतले व तो माणूस आहे तरी कसा?''

''ग्लॅडिएटर म्हणजे काय, तुम्हाला माहीत आहे का?'' हसत हसत बातियातुसने प्रश्न केला. कापुआचे ग्लॅडिएटर केवळ गुलामच नसतात, त्यांच्यात एक खासियत असते. एक त्वेष, द्वेष भरलेला असतो. जहरही पचवू शकतात ते. पण असे गुलाम घरगडी म्हणून निरुपयोगी असतात आणि शेतीवाडीतही त्यांचा काही वापर करता येत नाही. झुंज त्यांना आवडते. द्वंद्व युद्ध हा त्यांचा अतीव प्रेमाचा विषय असतो. फार पूर्वीपासून अशा झुंजार लोकांची एक जातच वेगळी मानली जात असे. त्यांनी कुणी गुलाम म्हणत नसत. ग्लॅडिएटर का लढतो त्याचे एक कारण आहे. त्याच्या हातात शस्त्र दिले की, त्याला आपण मुक्त झाल्याचे स्वप्न पडू लागते. त्याला तेवढेच हवे असते. हातात शस्त्र आणि मनात मुक्तीचे स्वप्न.''

''अशी माणसे कुठे मिळतात?'' बातियातुसच्या वर्णनाने प्रभावित झालेल्या आणि गोंधळून गेलेल्या जनरल क्रासुसने विचारले.

''अशी एकच जागा आहे. कोळशाच्या खाणी. तिथे काम केलेल्या गुलामांच्या दृष्टीने आपल्याकडची गावे म्हणजे स्वर्गच असतो. शेतात राबणे हे त्यांच्या दृष्टीने अगदीच मौजमजा केल्यासारखे असते. कोळशाच्या खाणीत त्यांना इतके कष्ट पडतात, की त्यामानाने फासावर चढवणे हे सुद्धा त्यांच्यावर एकप्रकारची कृपाच ठरावी. अशा दुर्गम खाणींवर माझे दलाल जातात आणि ग्लॅडिएटर शोधून आणतात. स्पार्ताकुसही त्यांना तिथेच सापडला. गुलामांच्या तिसऱ्या पिढीतला तो वंशज आहे. ज्याचे वडील गुलाम होते अन् आजोबाही गुलाम होते अशा तिसऱ्या पिढीतल्या गुलामाला इजिप्शियन भाषेत 'कोरू' असे म्हणतात. या शब्दाचा अजून एक अर्थ आहे - चतुष्पाद जनावर. इतर रानटी जनावरेही ज्याची संगत टाळतात अशा जनावराला इजिप्शियन लोक कोरू म्हणतात. स्पार्ताकुस या प्रकारचा होता - कोरू. वंशाने थ्रासियन असला तरी त्याला इजिप्तमधून आणले होते. इजिप्शियन दलाल अथेन्समधून गुलाम विकत घेतात. बहुधा ते 'कोरू' वर्गातील असतात. त्यातही थ्रासियन्सना अधिक मूल्य असते. कारण ते जमिनीच्या खालीही उत्तम तग धरू शकतात.''

''पण मग स्पार्ताकुसला ग्रीसमध्ये विकत घेतले असा बोलबाला आहे, तो कसा काय?''

''लोक काहीही बोलत असतात. ते तसे का बोलतात हे मी कोण सांगणार? स्पार्ताकुसची खरेदी कुठें झाली हे मला माहीत आहे कारण मीच त्याला विकत घेतले होते. हा सगळा व्यवहार झाला तो थिब्समध्ये.''

''स्पार्ताकुस, इजिप्त आणि थिब्सविषयी मला अधिक सांगा.'' क्रासुसने त्याला बोलते करण्यासाठी प्रोत्साहित केले.

◆◆◆◆

बायबलमध्ये नरक हा शब्द लिहिला जाण्याआधीही पृथ्वीवर एक नरक होता. माणसांनीच निर्माण केलेला होता. जुलै महिन्याच्या भयाण उकाड्यात थिब्सकडून नाईलच्या भागाकडे जाताना एकाएकी नदीच्या काठावरची हिरवाई वटून गेलेली दिसते. असे वाटते की इथे कधी काळी प्रचंड डोंगर होते व इथल्या कोरड्या हवेमुळे त्यांची भुकटी झाली असावी. प्रचंड उष्म्याने दगडांचाही भुगा होतो हे सिद्ध करणारा हा परिसर आहे. पण या सुरुवातीच्या भागात किमान थोडीतरी हवा असते. पुढे नैऋत्येकडे नुबियन वाळवंटाच्या दिशेने गेले की, हवेच्या थोड्याफार झुळकीही बंद झालेल्या दिसतात. तिथून पुढे दक्षिणेकडे गेले की, पृथ्वी मरून पडली आहे असा भास होतो. तिथे वारा नाहीच, फक्त हवा असते, ती देखील भट्टीत तापल्यासारखी गरम. तिथे वावरणाऱ्या माणसांपाशी कसलेही भान शिल्लक राहिलेले नसते. उष्म्याने प्रत्येक गोष्टीतील जिवंतपणा आटून गेलेला दिसतो. या परिसराला केवळ वाळवंट म्हणून चालणार नाही. प्रत्यक्ष मृत्यूची स्वाक्षरी असलेला कोरड्या पांढुरक्या भुकटीचा हा प्रदेश. येथे काहीच उगवत नाही. कातळांच्या वाळवंटात वेडीवाकडी चिवट झुडपे तरी उगवतात, वाळूच्या वाळवंटात निरुपयोगी गवत तरी इथे-तिथे दिसते; या इथे अक्षरश: काहीही उगवत नाही. हा प्रदेश म्हणजे जगभरच्या नापिकांना लाजवणारा पडीक प्रदेश आहे.

उष्म्याच्या लाटांच्या थपडा खात आपण पुढे जाऊ लागलो, की अकस्मात या नरकाचा एक नवाच परिसर आपल्याला सामोरा येतो. अनोळखी वाटणारी काळी वर्तुळे दिसू लागतात. ही वर्तुळे म्हणजे काळ्या पाषाणांचे प्रदेश. यातच मध्ये मध्ये पांढरा शुभ्र संगमरवर रक्तवाहिन्यांसारखा पसरलेला असतो. शुभ्र आणि चमचमणाऱ्या या संगमरवरात सुवर्णकण असतात. त्या सोन्याच्या नादानेच माणसे इथे येतात. एकेकाळी इजिप्तमधील फराहो जमातीच्या लोकांनी या परिसरात सोने असल्याचे शोधून काढले. तेव्हा ते तांब्याच्या आणि काशाच्या हत्याराने आघात करून सोने अगदी सहज काढत असत. परंतु पिढ्यान्‌पिढ्या अशाप्रकारे सोन्याची लयलूट झाल्यामुळे आता काळा कातळ कापत जावे लागते. अर्थात, लोखंडी हत्याराने ते आता सुसह्य झाले आहे. पण अशा प्रकारची ढोर मेहनत घेण्यासाठी इथियोपिया आणि इजिप्तमधील शेतकरी कुचकामी ठरायचे. साधारण गुलाम खर्चिक ठरायचे आणि इकडे आणल्यानंतर उष्म्याने हैराण होऊन मरून जायचे. त्यामुळे लढाईत जेरबंद झालेले सैनिक आणि कोरू जातीच्या पिढीजात गुलामांची मुले येथे आणली जायची. काळ्या कातळाच्या पट्ट्यामध्ये शिरल्यानंतर रक्तवाहिन्या अरुंद व्हायच्या. त्यामुळे केवळ बालगुलामच येथे तग धरून राहू शकत असत.

अशा या अतिदुर्गम ठिकाणी गळ्यात लोखंडी साखळदंड घालून आणलेल्या १२२ थ्रासियन गुलामांमध्ये पहिल्या रांगेतील बारावा गुलाम म्हणजे स्पार्टाकुस. इतर सर्वांसारखा तो जवळजवळ नग्नच आहे फक्त लज्जारक्षणापुरते एक छोटे कापड त्याच्या अंगावर आहे.

इतर सर्व गुलामांप्रमाणे त्याचे केस लांब आणि दाढी वाढवलेली आहे. त्याची पादत्राणे संपूर्ण झिजलेली असून जेवढा भाग शिल्लक आहे तेवढाच त्याने पायात टिकवून ठेवलेला आहे. भाजणाऱ्या वाळूत त्या चप्पल तुकड्याचे तेवढेही संरक्षण सोडायला तो तयार नाही. त्याच्या तळपायाची त्वचा पाव इंच जाड आणि चामड्यासारखी टणक असूनही त्या रणरणत्या वाळवंटात ती कुचकामी ठरते आहे.

शृंखलांसह वाळवंट तुडवीत असलेला स्पार्ताकुस तेवीस वर्षांचा आहे. पण इतकी अंगमेहतन करणाऱ्या माणसाची एक वयरहित अवस्था होते, तसे त्याचे झाले आहे. ना तारुण्य, ना पौरुष्य, ना वृद्धत्व. पांढऱ्या भुकटीसारख्या वाळूने तो आपादमस्तक माखला गेलेला आहे. वाळूकणांच्या त्या थराखाली त्याची त्वचा भाजून तपकिरी झाली आहे. त्याचे गहिरे, गडद डोळे त्याच्या चेहऱ्याबाहेर डोकावत आहेत. जणूकाही धगधगीत कोळसेच. तो उंच आहे की बुटका हे सांगणे कठीण आहे. कारण साखळदंडातली माणसे ताठ चालू शकत नाहीत. त्याचे संपूर्ण शरीर चाबकाच्या फटक्यांनी सोलून निघून राठ बनले आहे. स्नायूंमधील मांसलता निघून गेली आहे. मागे राहिला आहे तो फक्त वातड पीळ. या लोकांचे खाणे म्हणजे तरी काय - मूठभर गव्हाचे पीठ आणि बार्लिचा कडक रोट. शरीराचा कणान्‌कण हे दोनचार घास पुरवून घेत असत. त्यामुळे की काय मांसलता किंवा चरबी यांना त्या शरीरात स्थानच नसते. मान रूंद आणि पिळदार स्नायूंची असली तरी साखळदंडांच्या कळ्या जिथे स्थिरावतात तिथे झालेल्या जखमा स्पष्ट दिसत असतात. चेहरा रूंद पण नाक फुटलेले. कुठल्यातरी धन्याने कधीतरी मारलेल्या लोखंडी सळईची ती कायमची आठवण चेहऱ्यावर घेऊन तो फिरतो आहे. विस्फारलेले डोळे आणि बसके नाक यामुळे त्याच्या चेहऱ्यावर एक मवाळ शेळीसारखा भाव निर्माण झालेला आहे. त्याचे ओठ जाडजूड आहेत त्यावरून तो थोडा भावनाशील वाटतो. कसलीशी खंत वाटून त्याने ओठ मागे घेतले तर त्याची पांढरी शुभ्र कुंदाच्या कळ्यांसारखी सुंदर दंतपंक्ती दिसू लागते. आजानुबाहू म्हणता येईल असे ढोपरापर्यंत लांब हात सुंदरच म्हणावे लागतील. त्याच्यातले सर्व सौदर्य जणूकाही त्याच्या दोन्ही हातांमध्ये एकवटलेले आहे. ... तर हा आहे स्पार्ताकुस थ्रासियन गुलाम. अशा गुलामाचा पुत्र जो स्वत:ही एका गुलामाचाच पुत्र होता. कुणालाही त्याची नियती माहीत नाही. कोणालाही त्याचे भवितव्य माहीत नाही. भविष्य म्हणजे काही वाचून भिरकावून द्यायचे अद्‌भूत गोष्टींचे पुस्तक नव्हे. भूतकाळ केवळ ढोरमेहनतीने भरलेला असल्याने तो लक्षात ठेवायचे काहीच कारण नाही. कष्ट करणारे दुसरे काही करतील असे त्याला कधी वाटलेलेही नाही. पाठीवर चाबकाचा फटकारा सहन करत कष्ट करणे एवढेच गुलामाचे काम. परिस्थितीत कधी बदल होईल असेही त्याला कधी वाटलेले नाही.

अतिउष्ण वाळूतून काळे कातळ कापत असताना स्पार्ताकुस कसला विचार करीत असेल? हे लक्षात ठेवले पाहिजे, की साखळदंडाने जखडलेली माणसे फारच कमी विचार

करतात आणि अशा परिस्थितीत खाणे-पिणे, झोपणे, पुन्हा कधी खायला मिळेल, प्यायला मिळेल, झोपायला मिळेल या पलीकडे फारसा विचार करणे बरेही नसते म्हणून स्पार्ताकुसच्या किंवा त्याच्या थ्रासियन साथीदारांच्या मनात फार गुंतागुंतीचे विचार येत नाहीत. तुम्ही एकदा माणसांचे जनावरात रुपांतर केले की, ती देवदूतांसारखा विचार करत नाहीत.

दिवस मावळतीला आलेला आहे व वातावरण थोडे सैल होत आलेले आहे. एवढा बदलही अशा गुलामांना विसावा देण्यास पुरेसा असतो. स्पार्ताकुस वर पाहातो. त्याला कातळाची काळी पट्टी दिसते. आपण नुबियात आहोत व यापेक्षा भयानक असे जगात काहीही नाही हे त्याला माहीत आहे. गुलामांचा एक स्वतंत्र भूगोल असतो. त्यांना समुद्राचा आकार माहीत नसेल, पर्वतांची उंची माहीत नसेल, नदीच्या प्रवाहांची दिशा माहीत नसेल. पण त्यांना स्पेनच्या चांदीच्या खाणी माहीत असतात; अरेबियातील सोन्याच्या खाणी, उत्तर आफ्रिकेतील लोखंडाच्या खाणी, कॉकेशसमधील तांब्याच्या खाणी, गॉलच्या कथलाच्या खाणी माहीत असतात. ते जिथे काम करतात त्यापेक्षा भयानक ठिकाणे त्यांना माहीत असतात. नुबियात आल्यावर तुलना संपते. त्याहून भयानक असे जगात काहीच नाही.

काळ्या कातळाच्या त्या पट्ट्याकडे स्पार्ताकुस बघत राहातो. इतरही गुलाम तिथे बघत राहातात आणि गुलामांची अख्खी रांगच थांबून जाते. पाण्याच्या पिशव्या आणि गव्हाच्या गोण्या पाठीवर वाहणारे ऊंटही थांबून जातात. गुलामांवर देखरेख करणारे म्होरकेही हातातल्या चाबूक आणि छड्यांसकट थांबून जातात. काही क्षण नरकाच्या त्या प्रवेशद्वाराकडे सगळेच पाहात राहातात. मग हळूहळू रांग पुन्हा पुढे सरकते. त्या काळ्या कातळापर्यंत हा ताफा पोहोचतो. सूर्य मावळतीला आलेला असतो. काळेभोर प्रस्तर अधिकच काळवंडून जातात. हिंसक वाटू लागतात. दिवसाचे काम संपलेले असते. आपापली कामे संपवून गुलाम त्या खाणीतून बाहेर पडू लागतात.

''कोण असतील ते? कुठले असतील?'' स्पार्ताकुसचे विचारचक्र सुरू होते. त्याच्या मागेच चालणारा एकजण म्हणतो - ''देवा, पाव बाबा मला!'' पण देव त्याला तेथे पावणारा नसतो. येथे देवच नाही, तर तो कसा पावणार आणि कुठूनतरी आलाच तर या वाळवंटात तो तरी काय करणार. खाणीतून येणारी माणसे जवळून दिसू लागली तेव्हा स्पार्ताकुसच्या लक्षात आले की, ही काही वाळवंटातील अनोळखी जमात नाही. आपल्यासारखीच माणसे आहेत. मुलेही आहेत. तरीही त्यांच्यात व आपल्यात फरक पडलेला आहे. आतून बाहेरून फरक पडलेला आहे, इतका की आता त्यांची माणूस म्हणून शिल्लक राहाण्याची इच्छाही राहिलेली नाही. अनेक वर्षांच्या हालअपेष्टा सोसून फत्तरासारखे बनलेले स्पार्ताकुसचे हृदयसुद्धा त्यांची ती अवस्था बघून भीतीने कापू लागले. आपल्यातला करूणेचा झरा आटून गेला आहे असे त्याला वाटत होते. पण त्यांना बघून तो पुन्हा पाझरू लागला. आपला शुष्क

देह अजूनही अश्रू निर्माण करू शकतो याची त्याला जाणीव झाली. तो त्यांच्याकडे बघत राहिला त्याच्या पाठीवर चाबकाचे आवाज उमटले, तरी तो एकाच जागी थांबून त्यांच्याकडे टक लावून पाहातच राहिला.

अरुंद खाणीमधून ते गुलाम रांगत रांगत बाहेर आले. बराच काळ वाकल्या अवस्थेत खाणीत काम केल्यामुळे ते उभे राहू शकत नव्हते. खाणीबाहेर पडल्यानंतरही ते जनावरांसारखे चार पायांवर चालत राहिले. इथे आल्यापासून त्यांनी आंघोळ केलेली नव्हती व यापुढे कधीही त्यांना ती चैन लाभणार नव्हती. त्यांची त्वचा म्हणजे काळी भुकटी व तपकीरी मळ यांचे जणू ठिगळकामच झाले होते. त्यांचे केस वाढलेले होते. त्यांच्या जटा झाल्या होत्या. त्यातले जे प्रौढ होते त्यांच्या दाढ्या वाढल्या होत्या. त्यातले काही काळे होते तर काही गोरे. पण तो फरक पटकन लक्षात येत नसे. कोपर आणि गुडघ्यांवर घट्टे पडलेले होते. ते संपूर्णपणे नग्नावस्थेत होते आणि तसे पाहिले तर कपड्यांची काय गरज होती? कपड्यांमुळे ते जास्त काळ जिवंत थोडेच राहू शकणार होते? या खाणी चालविण्याचा एकमेव हेतू होता - रोमन खाणमालकांचा जास्तीत जास्त फायदा करून देणे. घाणेरड्या कपड्यांनाही थोडेफार का होईना पैसे पडतातच, तेवढेही खर्च करण्याची मालकांची तयारी नव्हती. म्हणून हे गुलाम नागव्यानेच काम करीत. प्रत्येकाच्या मानेवर लोखंडी किंवा कास्य गळपट्टा होता. काळ्या फत्तरावरून जेव्हा ते रांगत जात असत तेव्हा म्होरक्या प्रत्येकाच्या गळपट्टीला एक लांबलचक साखळीच्या कड्या जोडून देत असे. अशा वीस जणांना एकत्र जोडले की, ते आपल्या राहात्या जागी जात. नुबियन खाणीतून आजपर्यंत कुणीही बाहेर पळून जाऊ शकले नव्हते. एक वर्षभर तेथे काढल्यानंतर त्या अवस्थेतही कुणी राहात नसे.

स्पार्ताकुस त्यांच्याकडे टक लावून पाहातो. माणूस असणे व गुलाम असणे यातला फरक चाचपत राहातो. 'बोला, एकमेकांशी बोला.' स्वगतासारखे तो स्वत:शीच पुटपुटतो. पण ते काही बोलत नाहीत. 'हसा' तो पुन्हा पुटपुटतो. पण कुणीही हसत नाही. त्यांच्या सोबत त्यांची हत्यारे आहेत. लोखंडी कुदळ, फावडी, हातोड्या वगैरे. त्यांच्यापैकी अनेकांच्या डोक्यावर घासलेटचे दिवे होते. लहान मुले अगदी किडकिडीत होती. त्यांचे हाडकुळे हातपाय, मोठे डोके यामुळे ती भिंतीवरून सरपटणाऱ्या कोळ्यांसारखी वाटत होती. या मुलांची कधीच वाढ होत नाही. या खाणींवर आल्यानंतर जास्तीतजास्त दोन वर्ष ती तग धरतात. ही मुले अगदी मरायला टेकली की दुसरी आणली जातात. पण नवीन मुलांकडे वळून पाहण्याचे कुतूहलही त्यांच्यात शिल्लक रहिलेले नसते. जगण्यामरण्याविषयी ती अगदी बेपर्वा झालेली असतात. स्पार्ताकुसला वाटले, काही काळानंतर आपलीही अवस्था अशीच होणार आहे. मृत्यूविषयी सुद्धा काहीही न वाटणे हे प्रत्यक्ष मृत्यूपेक्षा अधिक भयावह आहे.

गुलाम आता जेवायला जातील. त्यांच्याबरोबर थ्रासियन गुलामांनाही घेऊन जाण्यात येईल. त्यांची बराक कातळाचा आधार घेऊनच बांधलेली असते. ती कधी बांधली आहे

तेही आता कोणाच्या लक्षात नाही. काळ्या दगडांच्या मोठमोठ्या पट्ट्या वापरून केलेला आडोसा म्हणजे ही बराक. त्यात उजेड नसतो. दोन्ही बाजूंनी आत शिरायची जी वाट तीच हवेचीही वाट. वेगळ्या खिडक्या वगैरे नाहीतच. अनेक दशकांची घाण तिथल्या फरशीवर पडून साठून टणक झालेली होती. म्होरके कधीच आत प्रवेश करीत नसत. गुलामांची आत काही गडबड झालीच तर अन्न व पाणी रोखण्यात येत असे. भुकेने कासावीस झाले की आपोआपच गुलाम जनावरांप्रमाणे सरपटत बाहेर येत. एखादा गुलाम आतल्याआत मेला तर त्याचे शरीर बाहेर आणून टाकले जाई. लांबलचक बराकीच्या एखाद्या कोपऱ्यात एखादे लहान मूल मेले तर ते कळतही नसे. त्याच्या मृतदेहाचा सडका वास येऊ लागला की त्यावरून त्याच्या मृत्यूची जाणीव सर्वांना व्हायची.

गुलाम बराकीच्या जवळ येताच त्यांच्या साखळ्या काढल्या जात. त्यांच्या हातात एका लाकडी कटोऱ्यात अन्न आणि पाण्यासाठी चामड्याची पिशवी दिली जात असे. त्यात थोडेसे पाणी असे. असा शिधा दिवसातून दोन वेळा दिला जात असे. अतिप्रचंड उष्म्यात एवढे कमी पाणी प्यायला मिळाल्यामुळे हळूहळू त्यांची मूत्रपिंडे खराब होऊन त्यांचे देह निस्तेज होऊ लागत. काम करण्याची त्यांची शक्ती संपली की त्यांना मरण्यासाठी म्हणून वाळवंटात हाकलून दिले जाई.

स्पार्ताकुसला या सगळ्या गोष्टी माहीत आहेत. गुलामांच्या जमातीची त्याला खडान्‌खडा माहिती आहे. गुलाम असण्याचे खास गुपित त्याला माहीत आहे. गुलामांना सुख-सुविधा,अन्न, संगीत, हास्य, प्रेम, ऊब, स्त्रीसंग, दारू कशाकशाचीही इच्छा नसते. त्यांच्या मनात एकच इच्छा शिल्लक राहाते - कसे बसे जिवंत राहण्याची. तग धरून राहण्याची. स्पार्ताकुसला या इच्छेचे कारण मात्र कळत नाही. असे नुसते जिवंत राहाण्यात काय हशील आहे? पण गुलामांना हे जाणून घेण्याची प्रेरणाही होत नाही. जनावरही अशा अवस्थेत जगणार नाही. जिवंत राहण्यासाठीची एकमेव इच्छा शिल्लक राहाणे ही फार गुंतागुंतीची गोष्ट आहे. ज्या लोकांवर अशी वेळ येत नाही त्यांना ती कधीच कळत नाही. अर्थात या जीवनेच्छेलाही एक कारण आहे आणि नेमके तेच स्पार्ताकुसला माहीत नाही.

स्पार्ताकुसचे विचारचक्र सुरूच असते. कशाही परिस्थितीत तग धरून राहायचे. शृंखला काढल्या की तेवढ्या वेळेपुरते का होईना स्वातंत्र्य भोगायचे. तो आणि त्याच्या साथीदारांनी या शृंखलांची सोबत अनेक आठवडे सहन केली होती. समुद्रापलिकडच्या त्याच्या देशातून नाईल नदीपर्यंत येईतो व तेथून पुढे या वाळवंटात पोहचेपर्यंत. आत्ता या क्षणी हातापायात मात्र बेड्या नाहीत. किती मोकळे वाटतेय. शरीर पिसासारखे हलके वाटतेय. नव्याने निर्माण होणारी ही शक्ती जपायला पाहिजे. त्याला दिलेले पाणी तो स्वीकारतो. अनेक आठवड्यात त्याने एवढे पाणी पाहिले नव्हते. घटाघट घोट घेऊन ते वाया घालवायचे नाही, असे त्याने

ठरविले. तासाभरात एखादा घुटका घ्यायचा व ते सर्व पाणी - त्यातला थेंब न् थेंब शरीराच्या पेशींमध्ये शोषून घेतला जाईल अशा तऱ्हेने ते पुरवून प्यायचे. त्यांनी दिलेले अन्नही तो स्वीकारतो. सुकवलेले टोळ घालून शिजवलेली कणिक आणि बार्लिची कांजी. यापेक्षा वाईट अन्नही त्याने खाल्लेले आहे. अन्नाचा मान राखावा. जे अन्नाचा अवमान करतात ते लवकरच मरून जातात. असाही एक विचार त्याच्या मनात येऊन गेला. बराकीच्या काळोखात तो शिरला तेव्हा तिथल्या सडक्या वासाने त्याचा मेंदू कुरतडायला सुरूवात झाली. पोटात ढवळून आले. पण त्याने विचार केला, की कुठल्याही परिस्थितीत ओकारी येऊ द्यायची नाही. फक्त मूर्ख आणि मुक्त माणसांना ओकारीची ही चैन परवडते. आपण घेतलेले अन्न ओकारी वाटे वाया घालवायचे नाही. वासाने काही माणूस मरत नाही. आपण हा वास सहन करायचा. त्याची सवय करावी. म्हणजे आपोओपच त्याचा ऊग्रपणा बोचेनासा होईल.

अंधारात तो चालू लागला. त्याची पावलेच त्याला दिशा दाखवू लागली. जणू काही पावलांचेच डोळे झाले. अंधारातील वाट त्याला दाखवू लागले. इतक्यात एक बसका आवाज ऐकू आला. ''स्पार्ताकुस, तू कुठे आहेस?'' त्यानेही उत्तर दिले, ''हा मी इथे आहे, थ्रासियन.'' तो शब्द उच्चारताच थ्रासियन जमातीचे सगळे गुलाम त्याच्या भोवती जमा झाले. एकमेकांचे हात हातात धरून परस्परांचे स्पर्श अनुभवू लागले. ते सर्वजण त्याला थ्रासियन म्हणतात. त्याने आपला हात लांबवून त्यातल्या एकाच्या चेहऱ्यावरून फिरवला. त्याच्या हाताला ऊनऊन अश्रू लागले. अशी टिपे गाळणे हेही एका प्रकारे शक्ती वाया घालवण्यासारखेच आहे. त्यातला एकजण कुजबुजत्या स्वरात म्हणाला, ''स्पार्ताकुस, आपण कुठे आहोत?'' त्याने उत्तर दिले - ''आपण हरवलो नाही एवढे नक्की. आपण इथपर्यंत कसे आलोत तेही आपल्याला चांगले आठवते.''

''आपली कुणी आठवण काढेल का?''

''आपण हरवलो नाही,'' तो पुन्हा एकदा बजावून सांगतो.

पुन्हा एकदा कुणाचा तरी प्रश्न. ''पण आपली कुणी आठवण तरी काढत असेल का?''

अशा प्रकारे संवाद सुरू राहू शकत नाही. त्यामुळे तो गप्पच राहातो. त्यांच्या दृष्टीने तो पित्यासमान आहे. त्यांच्या टोळीच्या वहिवाटीनुसार दुप्पट वयाचा माणूस पित्यासमान असतो. ते सगळेच थ्रासियन आहेत. पण तो त्यांचा पिता आहे. जणू काही टोळीप्रमुख. त्यांच्या भावना लक्षात आल्याने तो त्यांच्यासाठी हलक्या आवाजात एक गाणे म्हणू लागतो. बापाने मुलांना गोष्ट सांगावी, तसे -

*पुळणीवरती फेनिल फेनिल लाटा फुटती, पश्चिम वाऱ्यावरती त्या बागडती*
*उद्‌भव त्यांचा खोल सागरी संतत होई, किनाऱ्यावरी येता येता धनुष्याकृती*
*परस्परांशी लगडुनिया त्या मंथन करिती, सैनिक जमले जायाला जणू युद्धावरती.....*

त्याच्या या गाण्याच्या जादूने सारेच जण मुग्ध होऊन गेले. त्यांच्या दु:ख वेदनांचा त्यांना अल्पकाळ का होईना विसर पडला. त्यालाही आश्चर्य वाटले. 'या जुन्या गाण्यांमध्ये काय जादू असते.' तो स्वत:शीच पुटपुटला. बराकीतल्या भयानक काळोखातून काही क्षण जणू काही सारेजण मुक्त झाले. जणू काही ट्रॉय नगरीच्या मोतिया रंगाच्या समुद्रकिनाऱ्यावर ते उभे आहेत असा त्यांना भास झाला. तिथले चकाकत्या सुवर्णकांतीचे कास्य शिरस्त्राणे घातलेले योद्धे त्यांच्या नजरेसमोर उभे झाले. गाण्याचा आवाज जसजसा तीव्र आणि सौम्य होत गेला तसतशा दहशत व चिंतेच्या गाठी मोकळ्या होत गेल्या. अंधारातच एक प्रकारची गती निर्माण झाली. थ्रासियन बोलभाषा छोट्या छोट्या गाण्यातून जुन्या पिढीचे शहाणपण जपून ठेवते. कसोटीच्या वेळी ही गाणीच त्यांना तारतात.

गाणे गुणगुणता गुणगुणताच त्याला झोप लागते. आता तो शांतचित्ताने झोपायला शिकला आहे. जुन्या आठवणी कधी आल्याच तर त्या बालपणी त्याने पाहिलेल्या प्रशांत निळ्या आकाशाच्या, नितळ सूर्यप्रकाशाच्या, वाऱ्याच्या शीतल झुळकांच्या असतात. त्याला आठवतात ते पाईन वृक्ष, कुरणांवर चरणाऱ्या बकऱ्या व एक वृद्ध माणूस जो त्याला वाचायला शिकवायचा. एका मोठ्या काठीने तो जमिनीवर अक्षरामागून अक्षरे काढायचा आणि म्हणायचा, ''बालका, वाचता आले पाहिजे, ज्ञान मिळवले पाहिजे. आपल्या हातात तेवढेच हत्यार. त्याशिवाय आपण म्हणजे जनावरेच. ज्या देवाने माणसांना अग्नी दिला त्यानेच त्यांना आपला विचार लिहून काढण्याची शक्ती दिली. ती शक्ती अशासाठी दिली की, खूप खूप वर्षापूर्वीच्या सुवर्णकाळात देवांनी व्यक्त केलेले विचार त्यांनी आठवावेत आणि लिहून काढावेत. तेव्हा माणसे देवाची लाडकी होती आणि हवे तेव्हा देवाशी बोलू शकत असत. तेव्हा कुणी गुलाम नव्हते आणि तसा काळ पुन्हा येणार आहे.'' झोपेची गुंगी लागता-लागताच स्पार्ताकुसला हे सगळे आठवत जाते. त्याचेच एक स्वप्न होते आणि तो निद्रेच्या आधीन होऊन जातो.

सकाळी ड्रमच्या आवाजाने स्पार्ताकुसला जाग आली. बराकीच्या दारपाशी मोठमोठ्याने ड्रम वाजविण्यात येत होता. त्याचा प्रतिध्वनी घुमून कानांचे पडदे फाटून जातील की काय असे वाटत होते. तो जागा झाला. सगळे गुलाम जागे झाले. दाराच्या दिशेने चालू लागले. भोवताली अद्यापही मिट्ट काळोख होता. त्या तशा काळोखातही स्पार्ताकुस आपला कप व कटोरा घ्यायला विसरला नाही. या वस्तू नेल्या नाहीत तर आपल्याला अन्नपाणी मिळणार नाही, हे त्याला माहीत होते. गुलामीतल्या अनेक गोष्टी त्याच्या अंगवळणी पडल्या होत्या. त्या बाबतीत तो शहाणासुरता झाला होता. पहाटेपूर्वी तासभर हा ड्रम वाजायचा. तेवढा एकच तास वाळवंट गार वाटायचे. दिवसभरातला हा केवळ एक तास वाळवंट मित्रासारखे वाटायचे.

गुलामांवर देखरेख ठेवणारे म्होरके एका बाजूला एकत्र उभे राहायचे. पावाचे तुकडे चघळत आणि पाण्याचे घोट घेत ते अन्नवाटप करायचे. त्यांच्या अंगावर लोकरी कपडे असत.

प्रत्येकाकडे एक चाबुक, एक जाडजूड छडी आणि एक मोठा चाकू असे. ही सगळी म्होरकेमंडळी अलेक्झांद्रियाची असत. कडवट आणि कणखर. चांगला पगार मिळतो आणि खाणीत निघालेल्या सोन्यावर टक्केवारी मिळते म्हणून ते या नरकप्राय परिस्थितीत काम करायला तयार होत. श्रीमंती आणि ऐषआरामाची स्वप्ने पाहात ते येथे येत. खाणीमध्ये पाच वर्ष काम केल्यानंतर रोमन नागरिकत्व मिळेल असे आमिषही त्यांना दाखविले जात असे. आपल्या भवितव्यासाठी ते वर्तमानात हालअपेष्टा काढायला तयार झालेले असत. अलेक्झांद्रियाच्या झोपडपट्टीत राहाणारी ही माणसे त्याच्या स्वतंत्र बोलीत एकमेकांशी बोलत. ग्रीकांनी इजिप्तवर कब्जा करून अडीचशे वर्षे लोटली तरी कामगारांच्या तांड्याच्या प्रमुखपदी इजिप्शियन किंवा ग्रीक म्होरके आले नाहीत. त्यासाठी भ्रष्ट व्यवहार करणारे, तिरकस वागणारे आणि ईश्वरावर अजिबात विश्वास नसणारे असे हे अलेक्झांद्रियन म्हारेके नेमले जात. या कामपिसाटांना झोपण्यासाठी गुलामांची किडकिडीत पोरेही चालत असत. लाल समुद्राच्या किनाऱ्यावर उगवणाऱ्या 'खट' झुडुपांच्या पानांचा रस प्याल्याने गुंगी येत असे. तो रस पिऊन त्या गुंगीतच ते झोपेच्या आधीन होत असत.

हे ढेरपोटे म्होरके आणि चिपाडाहून चिपाड झालेले, जनावरांपेक्षा कमी प्रतीचे मानले जाणारे गुलाम.. सकाळच्या शांत वेळीही हे दृश्य पाहून स्पार्ताकुसच्या मनात हळूहळू संतापाचा उद्रेक होत गेला. खरे तर राग येणे गुलामांना शोभत नाही. तरीही स्पार्ताकुसच्या मनात स्फोट होतच राहातात.... कसले हे जगणे - पशुतुल्य... नव्हे, पशुंपेक्षाही वाईट.

ड्रमचा आवाज थांबतो. म्होरकेमंडळी आपल्या हातातले चाबुक फडकवतात. आसपासची हवा त्या आवाजाने भरून जाते. कामाची वेळ झालेली असते. छोटी छोटी गुलाम पोरे आता रांगत रांगत खाणीमध्ये शिरतील आणि सोन्याचे कण असलेले पांढरे फत्तर कुरतडायला लागतील. गुलामांपैकी काही जण स्पार्ताकुसभोवती जमले.

''बापा, किती भयानक नरक आहे हा!''

''सर्व काही ठीक होईल.'' स्पार्ताकुस उगीच बोलायचे म्हणून बोलतो. थ्रासियन गुलाम त्याला बाप म्हणतात. त्यामुळे दिलासा देणारे एखादे वाक्य बोलणे त्याला भाग असते.

म्होरक्यांपैकी एकजण त्यांच्यासमोर येऊन त्याच्या खास रांगड्या भाषेत विचारतो, ''कोण आहे तुमचा प्रमुख?'' कुणीही बोलत नाही. ''थ्रासियन गुलामांनो, एवढ्या सकाळी आम्हाला चाबूक मारणे आवडणार नाही.'' पटकन स्पार्ताकुस बोलून जातो, ''ते मला बाप म्हणतात.'' म्होरक्या त्याच्याकडे वरून खालपर्यंत बघतो. त्याचा अंदाज घेतो.

''बाप म्हणवून घेण्याइतके तुझे वय दिसत नाही.''

''आमच्या देशात अशी प्रथा आहे. दुप्पट वयाच्या टोळीवाल्यास बाप म्हटले जाते.''

''इथे वेगळे नियम आहेत, बरं का, बापा! मुले जेव्हा चुका करतात तेव्हा चाबकाचे फटके बापाला खावे लागतात. मी काय म्हणतो ते तुला ऐकू आले ना नीट?''

हो म्हणण्याखेरीच दुसरा इलाजच स्पार्ताकुसजवळ नव्हता. ''ऐका थ्रासियन गुलामांनो, ही जागा भयानक आहेच, पण त्याहून अधिक भयावह होऊ शकते. तुम्ही जिवंत असेतो भरपूर काम करावे आणि शिस्त पाळावी अशी आमची अपेक्षा आहे. तुम्ही मेलात तर आम्ही तुमच्याकडे काय मागणार? मरण्यापेक्षा जगणे केव्हाही चांगले असते. पण तुम्ही जर नीट काम केले नाहीत तर जगण्यापेक्षा मृत्यू पत्करला असे वाटावे, अशी वेळ आम्ही तुमच्यावर आणू शकतो.''

आकाशात सूर्य तापू लागतो. जबरदस्त उष्म्याच्या लाटा उठू लागतात. गुलामांचे काम सुरू होते. काळा कातळ खणून काढायचा आणि सुवर्ण कण असलेला स्फटिक बाहेर काढायचा. तासन्‌तास हातोडीचे घाव घालून काम चालायचे. काम करून करून स्पार्ताकुसच्या सर्वांगातून घाम वाहू लागला. अत्यंत कमी पाणी तेथे मिळत असे. त्यामुळे शरीरावाटे घाम जाणे म्हणजे मृत्यूला आमंत्रणच होते. दुसरीकडून तहानेने त्याचा जीव व्याकूळ झाला. घशाला कोरड पडली. हिंस्त्र, खवळलेल्या जनावरासारखी तहान त्याच्या अंगात थैमान घालू लागली. अजून चार तास काढायचे आहेत, या विचाराने तो वेडापिसा झाला. दुपारपर्यंत गुलामांची ही अवस्था होते हे म्होरक्यांना माहीत होते. त्यामुळे दुपारनंतर त्यांचे चाबुक चालू लागतात. चाबुक हाताळण्यात हे म्होरके फार प्रवीण असतात. गुलामाच्या अंगाच्या कुठल्याही भागाला ते चाबकाने स्पर्श करू शकतात. नाजूक, हळूवार, इशारेवजा, धमकीवजा..... चाबुक हे असे वाद्य आहे जे माणसाच्या अंगावर संगीत निर्माण करू शकते. रुद्रसंगीत! स्पार्ताकुसची तहान दसपटीने वाढलेली असते. पण आता पाणी मिळणार ते अगदी दिवसाचे काम संपल्यानंतरच. जीवघेणा दिवस संपणारच नाही असे वाटत राहाते. तरीही तो संपतो. सगळे काही संपते. सुरू होण्याची जशी एक वेळ असते तशी संपण्याचीही एक वेळ असते. जे सुरू होते ते अखेर संपतेच. पुन्हा एकदा ड्रमचा आवाज ऐकू येतो. दिवसाचे काम संपलेले असते.

स्पार्ताकुस हातोडा बाजूला ठेवतो आणि स्वत:च्या रक्ताळलेल्या हातांकडे पाहातो. काही थ्रासियन गुलाम त्याच्या भोवताली बसतात. त्यातल्या एका अठरा वर्षांच्या तरुणाला खूप वेदना होत आहेत. तो गडबडा लोळतो आणि अखेर एका कुशीवर पडून पाय पोटाशी गच्चपणे ओढून घेतो. वेदना त्याला असह्य होत असाव्यात. स्पार्ताकुस त्याच्या जवळ जातो.

''बापा, तुम्ही?'' पोरगा पुटपुटतो.

''हो, मीच.'' स्पार्ताकुस त्याला प्रतिसाद देतो आणि त्याच्या कपाळाचे चुंबन घेतो.

''बापा, अजून उबदारपणे माझे चुंबन घे, मी मरतो आहे आणि माझ्या आत्म्यात जे काही शिल्लक आहे ते मला तुला द्यायचे आहे.''

स्पार्ताकुस अतीव मायेने पुन्हा एकदा त्या मरणोन्मुख युवकाचे चुंबन घेतो. त्याला रडू

येत नाही. तो कोरडा झाला आहे. पूर्णपणे वठून गेला आहे. जळलेल्या चामड्यासारखी त्याची अवस्था झालेली आहे.

◆◆◆◆

अशा प्रकारे बातियातुसने स्पार्ताकुस व इतर थ्रासियन गुलाम नुबियाच्या सोन्यांच्या खाणींवर कसे आले व तिथली त्यांची अवस्था काय होती त्याचे वर्णन केले. या सगळ्यात बराच वेळ निघून गेला होता. पाऊस थांबला होता. सर्वत्र काळोख पडला होता. स्वत: क्रासुसही या कहाणीने प्रभावित झाला होता. तरीही त्याने स्वत:ला सावरून पुढचा प्रश्न केला–

''आणि मग स्पार्ताकुसने तिथून पलायन कसे काय केले?''

''तो पळून गेला नाही. अशा ठिकाणाहून कुणीही पळून जाऊ शकत नाही. ते ठिकाणच असे आहे, की माणसांच्या जगात पुनरागमन करण्याची गुलामांची इच्छाच तातडीने नष्ट होते. स्पार्ताकुस पळाला नाही. मी त्याला विकत घेतले.''

''तिथून, पण कशासाठी? आणि तो तिथे आहे हे तुम्हाला कसे कळले? तिथे जाऊन विकत घ्यावे असे काय त्याच्यात होते?'' क्रासुसने प्रश्नांची फैरच झाडली.

''मला माहीत नाही. पण झुंजीसाठी योद्धे निवडून ते विकत घेण्याची माझी ख्याती आहे. त्या बाबतीतली माझी हौस ही एक दंतकथा बनलेली आहे.'' आतापर्यंत त्याने वाईनची बाटली संपवली होती. नव्या बाटलीची मागणीही त्याच्या खास शैलीत त्याने क्रासुसकडे केली. क्रासुसने आपल्या शयनकक्षात जाऊन त्याच्यासाठी नवी बाटली आणली ती लगेच उघडून आपला प्याला त्याने काठोकाठ भरला.

''झुंजीच्या रिंगणात लढणारे योद्धे धाडसी असतात. सैनिकांसारखे ते सामूहिक हत्या करीत नाहीत. एकास एक लढतात. खरे योद्धे रोममध्ये नाहीत ते कापुआ आणि सिसिलीत आहेत. रोमन साम्राज्याचे एक तृतियांश लष्कर स्पार्ताकुसने चिरडून टाकले आहे. आज घडीला इटली स्पार्ताकुसच्या ताब्यात आहे. हां.... अखेर तुम्ही त्याचा पराभव करालच. रोमन साम्रज्यापुढे कुठलाही शत्रू टिकाव धरू शकत नाही. पण आज घडीला स्पार्ताकुसने अगदी स्पष्टपणे तुमच्यावर मात कलेली आहे.

''कबूल'' क्रासुस म्हणाले. 'पण स्पार्ताकुसला प्रशिक्षण कोणी दिले?'' त्यांनी विचारले.

''स्पार्ताकुसला मी प्रशिक्षण दिले. उत्कृष्ट झुंज रोममध्ये होत नाही. तुमच्या सैनिकांना लढाई कशी करायची ते कळत नाहीं. ती शिरस्त्राणे काय, ते अंगभर लपेटलेले पोषाख काय. असे वाटते की एखादे गर्भाशयातील अर्भक! रिंगणात जायचे असेल तर उघड्याने जा. हातात तलवार घेऊन जा. रिंगणातल्या वाळूवर रक्त पडलेले असते. तुम्ही आत गेलात की त्या ताज्या रक्ताचा वास येतो. ट्रंपेट वाजत असतात. ड्रमचा ठेका सुरू असतो. आकाशात सूर्य झळाळत असतो. रिंगणाबाहेर आरामात बसलेल्या स्त्रिया आपले छोटे छोटे हातरुमाल

हवेत उंचावून प्रोत्साहन देत असतात. झुंज बघताना त्यांची तहानभूक हरपते. दुपार होईपर्यंत एकतर तुम्ही जिंकता किंवा तुमचा कोथळा बाहेर पडलेला असतो. ही खरी लढाई व त्यासाठी साधे सैनिक कुचकामी ठरतात. त्यासाठी वेगळ्याच वंशातील लोक लागतात. अशी माणसे मी मिळेल तिथून शोधून आणतो. माझे एजंट जगात सर्वत्र फिरत असतात. पैसे मिळवण्यासाठी पैसे खर्च करायची माझी तयारी असते. मी त्यांना अशा ठिकाणी पाठवतो, जिथे दुर्बळ माणसे लवकरच मरतात व भ्याड आत्महत्या करतात. नुबियातील सोन्याच्या खाणीत वर्षातून दोनदा माझी माणसे जातात. एकदा मी स्वतःच तिथे गेलो होतो. तेवढी भेट पुरेशी ठरली.

सोन्याची खाण चालू ठेवण्यासाठी गुलामांना लवकर वापरून संपवून टाकावे लागते. बहुतेकजण दोन वर्षे तग धरतात. काहीजण सहा महिन्यातच मरून जातात. पण गुलामांचा फायदेशीर वापर करायचा असेल तर लवकरात लवकर त्यांच्याकडून काम करवून घेऊन त्यांना निकालात काढावे लागते. ते मेले की नवीन विकत घ्यायचे असतात. गुलामांना हे माहीत असते. त्यामुळे नेहमीच ते निर्ढावण्याचा धोका असतो. भीतीची भावना नष्ट होणे हा या वाळवंटातील एक मोठा साथीचा रोगच म्हणावा लागेल. आपल्याला मरायलाच इथे आणले आहे हे कळल्यावर भीती गोठून जाऊ शकते. चाबकाची भीती वाटेनाशी झालेला असा एक माणूस उभा झाला की इतर सारे गुलाम त्याच्याभोवती जमतात. त्याचे ऐकू लागतात. अशा गुलामाला ताबडतोब ठार मारणे हाच सर्वोत्तम उपाय. मग त्याला उन्हाच्या झळांमध्ये फेकून द्यायचे असते. त्याच्यावर माशा बसतात. त्याचे उघडे पडलेले मांस खाऊ लागतात. इतरांनाही निर्भीडपणाचे परिणाम काय होतात ते कळून येते. पण अशा गुलामाला ठार मारून कुणाचाच फायदा होत नाही. म्हणून मी तिथल्या म्होरक्यांबरोबर संधान बांधलेले आहे. असा बेगुमान कुणी आढळला की त्याने तो माझ्यासाठी ठेवायचा. मी चांगली किंमत देऊन तो विकत घेतो. त्यांनाही पैसे मिळतात, मला झुंजार योद्धा मिळतो. थोडक्यात स्पार्टाकुस आणि गानिकुस नावाचा दुसरा एक थ्रासियन हे दोन गुलाम मी विकत घेतले. हे थ्रासियन वंशाचे लोक सुरामारीत फार प्रवीण असतात. सुरा असो, तलवार असो, त्यांचे प्राविण्य अतुलनीय असते. असे म्हणतात की, थ्रासियन वंशाच्या लोकांशिवाय अन्य लोकांच्या हातात तलवार शोभून दिसत नाही, असे तेथील महिलांचे मत आहे. मी माझ्या एजंटांच्या मार्फत त्यांना आणण्याची व्यवस्था केली. अलेक्झांद्रियावरून त्यांना साखळदंडाने बांधून बोटीतून नेपल्सला आणण्यात आले. तिथे माझा एक एजंट असतो. त्याने त्यांना डोलीतून माझ्याकडे पाठविले.''

''आम्ही योद्ध्याची झुंज बघायला जातो तेव्हा मनात असा काही विचारही येत नाही, की या झुंजीमागे मोठी गुंतवणूक असेल.''

''पन्नास लाख देनारी'' बातियातुस म्हणाला. ''कल्पना करा, पाच देशात माझे एजंट आहेत. नेपल्स बंदरावर माझा एक कायम एजंट असतो. माझ्या योद्ध्यांना मी उत्तम खाऊपिऊ

घालतो. उत्तम प्रतीचा गहू, बार्ली, गोमांस, चीज. माझी स्वत:ची झुंजीची रिंगणे आहेत. मोठ्या झुंजीसाठी बसण्याची उत्तम व्यवस्था असलेले लंबवर्तुळाकार झुंज-गृह आहे. ते संगमरवरी फरशीने बांधलेले आहे. त्याच्यासाठी दहा एक लाख देनारी एवढा खर्च आला. शिवाय या योद्ध्यांना खूष राखण्यासाठी मला स्त्रियांचीही व्यवस्था करावी लागते. स्त्रीसंग मिळाला की योद्धे चांगले लढतात. त्याआधी पोटभर खाऊनही येतात. उत्तम प्रतीच्या स्त्रियांची मी व्यवस्था करतो. धंदेवाईक किंवा प्रौढांना माझ्याकडे थारा नसतो. निरोगी कुमारिकाच मी स्वीकारतो.''

''स्पार्ताकुसला बायकोही होती ना?''

''हो, होती. तिचे नाव व्हरिनीया. मी विकत घेतली तेव्हा ती अवघी एकोणिस वर्षांची होती. कुजकट स्वभावाची जर्मन मुलगी. पिवळे केस आणि निळे डोळे जर एखाद्याला आवडत असतील तर देखणी ठरावी अशी ती होती. मला तिचा इतका राग यायचा की मी तिला ठारच मारणार होतो. त्याऐवजी मी तिला स्पार्ताकुसच्या ताब्यात दिली. तो एक मोठाच विनोद म्हणावा लागेल. स्पार्ताकुसला स्त्रियांचा तिटकारा होता. तर व्हरिनीयाला पुरुष आवडत नसत.''

बातियातुसला आता दारू पूर्णपणे चढलेली होती. तरीही त्याला अजून प्यावेसे वाटत होते. क्रासुसची परवानगी घेऊन त्याने वाईनच्या भांड्याला हात घालण्याचा प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला. ते भांडे कलंडून त्यातली वाईन जमिनीवर सांडली. एक लाल थारोळे तिथे साचून राहिले. त्या लाल रंगाकडे बघतच टेबलावर डोके ठेवून तो ग्लानीत बुडून गेला. स्पार्ताकुसला प्रशिक्षण देणारा बातियातुस आणि स्पार्ताकुसला नामशेष करण्यासाठी आलेले जनरल क्रासुस समोरासमोर होते. फरक एवढाच - प्रशिक्षक झोपला होता तर विध्वंसक जागा होता.

◆◆◆◆

**कादंबरीतील प्रमुख व्यक्ती**

| | |
|---|---|
| कायुस क्रासुस | : खानदानी घराण्यातील खुशालचेंडू तरूण |
| हेलेना क्रासुस | : कायुसची गर्विष्ठ बहीण |
| क्लॉदिया मारियुस | : हेलेनाची उच्छृंखल मैत्रीण |
| अंतोनियुस क्रासुस | : कायुसचे धनाढ्य काका |
| स्पार्ताकुस | : गुलामांचा झुंजार क्रांतिलढा उभारणारा शूरमर्द, 'शुद्ध' योद्धा |
| व्हरिनिया | : स्पार्ताकुसची सत्वशील, निधडी बायको |
| क्रिक्सुस, गानिकुस, डेव्हिड इ. | : योद्धे गुलाम |
| लेन्तेलुस ग्राकुस | : धूर्त, यशस्वी ज्येष्ठ सिनेटर |
| मार्कुस लिसिनियुस क्रासुस | : अहंमन्य रोमन जनरल |
| लेन्तुलुस बातियातुस | : बडा योद्धे-गुलाम व्यावसायिक |

# ३. मरेपर्यंत झुंज

चार वर्षांपूर्वीची गोष्ट. वसंत ऋतुतील एक रमणीय सकाळ. लेन्तुलुस बातियातुस भरपूर न्याहारी घेऊन नुकताच आपल्या कार्यालयात स्थानापन्न झाला होता. तेवढ्यात त्याचा ग्रीक हिशोबनीस खोलीत आला आणि दोन तरुण रोमन त्याला भेटू इच्छित असल्याची वर्दी त्याने दिली. काही जोड्यांची झुंज लावण्याच्या संदर्भात त्यांना बोलायचे होते.

बातियातुसचे कार्यालय आणि त्याचे कर्मचारी त्याच्या समृद्धीचे निदर्शक होते. सुशिक्षित आयोनियन गुलाम त्याच्याकडे कामाला होते. स्थानिक राजकारणात तो रस घेत असे. संघटित गुन्हेगारीत त्याचा छुपा हात असे. काही बड्या खानदानांशी त्याचा संबंध होता. कापुआमध्ये झुंजीसाठी योद्ध्यांना प्रशिक्षण देणारी त्याची शाळा होती. भविष्याच्या लाटेवर आपण आरुढ आहोत असा त्याचा दावा होता. गुन्हेगारी संघटनेचा म्होरक्या आज ना उद्या संपून जातो. प्रतिपक्षाचा विजय झाला की गुंड नामशेष होतात. नवा सिनेटर वस्ताद गुंडालाही अंदर करू शकतो. पण बातियातुसचे तसे नव्हते. त्याची योद्ध्यांची शाळा चांगली चालत असे. गुलामांची झुंज हा एक धनिकप्रिय करमणुकीचा प्रकार होता. कायदेशीर होता आणि व्यवसाय म्हणून सरकारमान्यही होता. त्यात पैसे गुंतवणे सुरक्षित आणि किफायतशीर होते. गावोगावी झुंजीची रिंगणे आणि झुंजगृहे उभी राहात होती. त्यातील सर्वात मोठे कापुआला होते. प्रशिक्षित योद्ध्यांची मागणी सतत वाढत होती. हे लक्षात घेऊन बातियातुसने योद्ध्यांची शाळा सुरू केली आणि त्याला उत्तम प्रतिसादही मिळाला. त्याचे स्वतःचे आलीशान झुंजगृह उभे राहिले. त्याच्या भव्य प्रासादात सुमारे चारशे माणसांचा वावर असायचा. योद्धे आणि त्यांच्या स्त्रियांसाठी स्वतंत्र जागा होती. शिवाय प्रशिक्षक, घरगडी, डोलीवाले असा सगळा जामानिमा होता. त्याचे कार्यालय वास्तुशिल्पींनी ग्रीक शैलीनुसार बांधले होते.

लेखापाल म्हणाला, ''दोघे आहेत. भरपूर अत्तर चोपडलेले, किमती अंगठ्या घातलेले, उत्तम पोषाखातले धनिक तरुण आहेत ते.''

''त्यांना आत पाठवून दे.'' बातियातुस म्हणाला. काही क्षणांनंतर ते दोन तरुण त्याच्या खोलीत आले. अतिनम्रपणा दाखवत बातियातुस उठून उभा राहिला. त्याच्या टेबलासमोरच्या दोन आसनांवर बसण्याची त्याने त्या युवकांना विनंती केली. त्यातील एक होता कायुस क्रासुस. मुलगी वाटावी इतका तो सुंदर होता. ब्राकुस नावाचा दुसरा तरुण त्या दोघात मोठा असावा. तोच बोलत होता. थंड निळे डोळे. वाळूच्या रंगाचे केस आणि पातळ ओठांच्या त्या तरुणाच्या चेहऱ्यावर तुच्छता निदर्शक भाव होते. कायुस फक्त ऐकण्याचे काम करीत होता. आणि मधूनमधून आपल्या मित्राकडे आदरमिश्रीत कौतुकाचे कटाक्ष टाकत होता.

ब्राकुसने दोघांची ओळख करून दिली आणि लगेच तो मुद्द्यावर आला.

''आम्हाला दोन जोड्यांचा झुंजीचा खाजगी खेळ करायचा आहे.''

''फक्त तुम्हा दोघांसाठी? बातियातुसने प्रश्न केला. त्यावेळी त्याचे दोन्ही हात टेबलावर होते. त्याच्या दोन हिऱ्यांच्या अंगठ्यातून प्रकाशकिरण परावर्तीत होत होते.

''आम्ही आणि आमचे दोन मित्र.''

''ते करता येईल.''

''झुंज मरेपर्यंत झाली पाहिजे.'' ब्राकुस थंडपणे म्हणाला.

''काय?''

''मला काय हवे ते तुम्हाला कळले असेलच. थ्रेसियन गुलामांच्या दोन जोड्या आणि मरेपर्यंत झुंज.''

''तुम्हाला दीर्घकाळ चालणारा खेळ पाहिजे आहे की अल्पकाळात नजरेसमोर दिसणारी प्रेते हवी आहेत? माझ्याकडे उत्कृष्ट थ्रासियन गुलाम आहेत. ते तलवारबाजीत प्रवीण आहेत. परंतु मृत्यूची अट ठेवली की झुंज पटकन संपून जाते. एवढे पैसे तुम्ही दिलेले असता आणि पाचदहा मिनिटात झुंज संपून जाते.''

''आम्हाला चांगली झुंजही पाहिजे आहे व मृत्यूची आमची अटही कायम राहील.''

''हा विरोधाभास आहे.''

''हे सगळे तुमच्या दृष्टिकोणातून झाले. तुम्ही माझ्याकडून पैसेही घेणार आणि तुमचे योद्धेही शिल्लक ठेवणार. मला योद्ध्यांच्या दोन जोड्या आमरण झुंजीसाठी पाहिजेत. मी त्या विकत घेतो आहे. हा सौदा तुम्हाला जमत नसल्यास मी इतरत्र जाईन.''

''ठीक आहे, तुम्हाला पंचवीस हजार देनारी खर्च येईल.''

''आणखी एक, दोन्ही जोड्यांनी नग्नावस्थेत झुंज दिली पाहिजे आणि ही झुंज मरेपर्यंत आहे याची त्यांना जाणीव तुम्ही आधीच द्यायला हवी.''

''झुंज सकाळच्या वेळेत होऊ शकेल काय?''

''नक्कीच, पण अशा प्रकारच्या झुंजी लवकर संपतात हे लक्षात घ्या.''

''मला इशारे देऊ नका.'' ब्राकुस म्हणाला. आणि मग कायुसकडे वळून त्याने विचारले, ''तुला योद्ध्यांच्या जोड्या बघायच्या आहेत का?''

कायुस लाजतबुजत हसला आणि त्याने मान हलवली. ते खोलीच्या बाहेर आले. ब्राकुसने लेखापालाजवळ आगाऊ रक्कम दिली. करारपत्रावर सह्या केल्या आणि ते त्यांच्या डोलीत जाऊन बसले. डोली व्यायामशाळेच्या दिशेने निघाली. व्यायामशाळेत पोहोचल्याबरोबर गुलामांनी डोल्या खाली ठेवल्या. ती जागा म्हणजे जणू काही एक भव्य पिंजराच होता. पन्नास फूट लांबीची आणि चाळीस फूट रुंदीची जागा लोखंडी पट्ट्या लावून बंद केलेली

होती. एका बाजूला योद्ध्यांची राहायची व्यवस्था होती. इतका कडक बंदोबस्त येथे का ठेवला जातो असा एक प्रश्न कायुसच्च्या मनात आला आणि त्याचे उत्तरही त्याला तिथल्या तिथे मिळाले. हे योद्धे म्हणजे साधेसुधे गुलाम नव्हते. त्यांना प्रशिक्षण देणे आणि पाळणे हिंस्त्र श्वापदांना माणसाळवण्याहूनही कठीण होते. कारण हे गुलाम हिंस्त्र तर होतेच शिवाय त्यांना मेंदूही होता. ते विचार करू शकत. श्वापदे काही विचार करीत नाहीत.

व्यायामशाळेत सुमारे शंभर योद्धे होते. कमरेपुरतेच वस्त्र त्यांच्या अंगावर होते. गुळगळीत दाढ्या त्यांनी केलेल्या होत्या आणि त्यांचे केस बारीक कापलेले होते. त्यांच्या हातात लाठ्या होत्या. सहा प्रशिक्षक तिथे वावरत होते. ते निवृत्त लष्करी अधिकारी असल्याचे उघडच दिसत होते. एका प्रशिक्षकाच्या हातात स्पॅनिश बनावटीची तलवार होती. एखाद्या लष्करी तुकडीत असावी तशी शिस्त तिथे होती. इतकी काळजी घेऊन प्रशिक्षण दिलेल्या एखाद्या योद्ध्याच्या मृत्यूची किंमतही तेवढीच असणार, हे कायुसने मनोमन मान्य केले.

प्रशिक्षण घेत असलेले ते योद्धे जबर शक्तिमान होते. त्यांच्या पिळदार स्नायूंमुळे त्यांच्या हालचाली वेधक वाटत होत्या. चित्यासारखी चपळाई त्यांच्यात होती. योद्ध्यांचे तीन प्रकार होते. इटलीत सर्वत्र या तिन्ही प्रकारचे योद्धे लोकप्रिय होते. त्यापैकी थ्रासियन लोकप्रियतेच्या शिखरावर होते. त्यात बऱ्याच ज्यू आणि ग्रीक वंशाच्या गुलामांचाही समावेश होता. 'सिका' नावाच्या एका खास कट्यारीने ते झुंज खेळत. आखूड आणि टोकाशी किंचित बाक असलेली ही कट्यार असायची. थ्रेस आणि जुदेयन या भागात ही कट्यार प्रचलित होती. योद्ध्यांचा दुसरा गट 'रेतियारी'' या नावाने ओळखला जायचा. तेही हळूहळू लोकप्रिय बनत चालले होते. मासळी पकडायचे जाळे आणि तीन टोके असलेला मासे खायचा टोचा या वेगळ्याच हत्यारांनी ते झुंजत. त्यांच्यापेक्षा बातियातुसला आफ्रिकन गुलाम अधिक आवडायचे. इथियोपियातील कृष्ण वंशाचे ते गुलाम उंच आणि लांबरुंद हाडापेराचे होते. या गुलामांच्या झुंजी 'मर्मिलोन्स' नावाच्या योद्ध्यांशी लावल्या जायच्या. ढालतलवारीने ते लढायचे. मर्मिलोन्समध्ये अधिकतर जर्मन आणि गॉल वंशियांचा समावेश असायचा.

कृष्णवर्णीय योद्ध्यांकडे बोट दाखवून ब्राकुस म्हणाला, ''ढाल तलवारीच्या लढाईला मोठे प्राविण्य लागते. पण ती कंटाळवाणीही होऊ शकते. थ्रासियन योद्धे विलोभनीय झुंज खेळतात.'' मग बातियातुसला उद्देशून तो म्हणाला, ''एक थ्रासियन विरुद्ध कृष्णवर्णीय अशी जोडी माझ्यासाठी तयार करा.'' बातियातुसने एकवार त्याच्याकडे पाहिले आणि नकारार्थी मान हलवली. ''ही काही जोडी होऊ शकत नाही, थ्रासियन योद्ध्याकडे फक्त कट्यार असते.''

''मला तसेच हवे आहे.'' ब्राकुस म्हणाला.

बातियातुस मागे पुढे पहात होता. एका प्रशिक्षकाची त्याच्याकडे नजर गेली. तो जवळ आला आणि समजावून सांगू लागला. ''कट्यारीला फक्त एकाच बाजूने धार असते आणि ती जाळ्यात अडकली की थ्रासियन संपला. कसायाने गाय मारावी तशा प्रकारचा हा रक्तपात ठरेल, त्याला झुंज म्हणता येणार नाही.''

''मला थ्रासियन योद्ध्याला मरताना पाहायचे आहे. त्यासाठी मी पैसे मोजणार आहे.'' ब्राकुस थंडपणे म्हणाला.

प्रशिक्षकाने चांदीची एक छोटी शिटी तीनदा वाजवली. सर्व योद्धे रांगेत उभे राहिले.

''कुणाला बोलवू?'' त्याने बातियातुसला विचारले.

''ड्राबा''

''ड्राबाऽऽ'' प्रशिक्षकाने ओरडून हाक मारली. एक कृष्णवर्णीय योद्धा रांगेतून बाहेर आला आणि त्यांच्या दिशेने चालू लागला. त्याच्या हातात एक जाळे व काठी होती. अतिभव्य असा तो योद्धा होता. त्याची काळी कुळकुळीत त्वचा घामाच्या थेंबांमुळे चकाकत होती.

''डेव्हिड''

''डेव्हिडऽऽ'' हा ज्यू वंशाचा योद्धा. त्याचे तोंड ससाण्यासारखे होते. उंचीमुळे तो किंचित वाकल्यासारखा वाटत होता. त्याचे ओठ पातळ होते आणि त्यामुळे त्याच्या चेहऱ्यावर एक कडवट भाव निर्माण झाला होता. त्याच्या डोळ्यांच्या बाहुल्या हिरव्या होत्या. त्याने आपल्या बोटांमध्ये लाकडी कट्यार पकडली होती. पाहुण्यांकडे त्याने निश्चल नजरेने पाहिले.

''आता एखाद्या थ्रासियनला बोलावू.'' ब्राकुस कायुसला म्हणाला. ''तू कधी ज्यू पाहिला आहेस का?'' कायुसने नकारार्थी मान हलवली.

''जोडीत ज्यू असला की झुंज चित्तथरारक होईल. ते 'सिका' फार चांगली चालवतात.''

''पोलेमुस''

''पोलेमुसऽऽ'' तो आला. थ्रासियन वंशाचा, तरुण, डौलदार आणि देखणा.

'स्पार्ताकुसऽऽ''

स्पार्ताकुस येऊन त्या तिघांच्या रांगेने उभा राहिला.

ते चार योद्धे आणि रोमन तरुण यांच्यामध्ये जाडजूड लोखंडी गज होते. ते पिंजऱ्यात आणि हे बाहेर. त्यांच्याकडे बघत असताना कायुसला काहीतरी नवे वेगळे आणि भयानक पाहात असल्याची जाणीव झाली. त्यांच्यात एक वेगळ्याच प्रकारचे पौरुष होते. त्यांना झुंज करण्याचे आणि ठार मारण्याचे प्रशिक्षण देण्यात आले होते पण ही झुंज म्हणजे श्वापदांची चढाई नव्हती. हिंस्त्र श्वापदांची चढाई नव्हती. नुसती झुंज. झुंजीच्या आनंदासाठीची झुंज.

''या दोन जोड्या चालतील का?'' बातियातुसने विचारले.

''ते तिघे ठीक आहेत पण तो फुटक्या नाकाचा नको. तो काही योद्धा वाटत नाही.''

''दिसते तसे नसते.'' बातियातुसने त्याला सांगितले. ''हा आहे स्पार्ताकुस. अतिशक्तीशाली आणि अतिचपळ. मी मुद्दामच त्याची निवड केली आहे.''

''त्याची झुंज कुणाबरोबर होणार?''

''कृष्णवर्णीयाबरोबर'' बातियातुस म्हणाला.

''चालेल, माझे पैसे वसुल होतील अशी आशा मी बाळगतो.'' ब्राकुस म्हणाला.

कायुसने स्पार्ताकुसला पाहिले ते त्यावेळी. अर्थातच नंतरच्या काळात तो त्यांची नावेही विसरून गेला. त्याच्या लक्षात राहिला तो प्रखर सूर्यप्रकाश. व्यायामशाळेच्या मातीचा गंध आणि त्या योद्ध्यांच्या निथळत्या घामाचा वास.

◆◆◆◆

ही व्हरिनिया गुडुप अंधारात डोळे टक्क उघडे ठेवून पडून राहिली आहे. रात्रभर तिचा डोळा लागलेला नाही. एक क्षणही ती झोपलेली नाही. तिच्या बाजूलाच स्पार्ताकुस पहुडलेला आहे. गाढ झोपला आहे तो. व्हरिनिया त्याच्याकडे पाहात राहिली. मंद गतीने त्याचा श्वास सुरू होता. हा श्वासच त्याच्या आतील जीवनाचा अग्नी प्रज्वलित ठेवत असे. जीवनाचा प्रवाह अव्याहत सुरू ठेवणारी गती ती हीच. भरती आणि ओहोटी, ऋतुंचे चक्र, मादीच्या गर्भाशयातील अंड्याचे सुफळ होणे.... यामागे हीच गती असते.

एखादा माणूस असा कसा निर्घोर झोपू शकतो? उठल्यावर काय घडणार आहे याची कल्पना असूनही आणि मृत्यूच्या कड्यापाशी आल्यानंतरही एखाद्यला अशी गाढ झोप कशी काय लागू शकते? ही शांती कुठून येते?

अत्यंत हळूवारपणे व्हरिनिया त्याला स्पर्श करते. त्याची त्वचा, त्याखालचे मांस, त्याच्या हातापायांचा स्पर्श ती अनुभवते. त्याची त्वचा लवचिक, टवटवीत आणि जिवंत आहे. स्नायू सैलावलेले आहेत. हातपाय त्याने मोकळे सोडून दिलेले आहेत. त्याच्यासाठी झोप मौलिक आहे. निद्रा त्याला जीवनाइतकीच महत्त्वाची वाटते आहे. (शांत झोप, माझ्या सख्या, माझ्या सौम्य, पवित्र आणि रुद्र सख्या; शांत झोप घे आणि तुझी शक्ती एकसंध ठेव.)

व्हरिनिया अतिशय हळूवार होत गेली. तिच्या सर्व हालचाली एखाद्या कुजबुजीसारख्या हलक्या होत गेल्या. ती त्याच्या अतिशय निकट आली. आपले अधिकाधिक अंग तिने त्याला भिडवले. कंबर, छाती असे करत करत तिने आपला चेहरा त्याच्या चेहऱ्याच्या अगदी निकट नेला. गालाला गाल लावले. तिचे सोनेरी केस त्याच्या मस्तकावर एखाद्या मुकुटासारखे पसरले. त्याच्या सहवासातल्या सुखद स्मृतींनी तिची उद्याविषयीची भीती कमी झाली. साहजिकच आहे. प्रेम आणि भय सहजासहजी एकत्र नांदत नाहीत.

(एकदा त्याला ती म्हणाली होती, तू माझ्यासाठी एक गोष्ट कर. आम्ही आमच्या जमातीत नेहमीच ते करतो. कारण आमची श्रद्धा आहे. हसऱ्या चेहऱ्याने तिच्याकडे पाहात

तो म्हणाला, 'तुमच्या जमातीत अशी कुठली गोष्ट तुम्ही एवढ्या श्रद्धेने मानता?' ती म्हणाली, 'ते मी तुला सांगितले तर तू हसशील.' तो म्हणाला, 'मी असा कधी तुला हसतो का?' मग तिने त्याला त्यांच्या जमातीतील ते गुपित सांगितले. 'आम्ही असे मानतो की माणसाचा आत्मा त्याच्या नाकातोंडातून श्वासावाटे प्रत्येकवेळी थोडा थोडा प्रवेश करीत असतो. बघ! तू हसतोयस की नाही?' तो म्हणला, 'मी तुला हसत नाही. जगात लोक कोणकोणत्या अद्‌भुत गोष्टींवर विश्वास ठेवत असतात त्याची जाणीव होऊन मला हसू आले.' त्याच्या त्या वाक्यावर ती चित्कारली, 'तू ग्रीक आहेस आणि ग्रीकांचा मुळी कशावरच विश्वास नसतो.' तेव्हाच त्याने पहिल्यांदा तिला सांगितले - 'मी ग्रीक नाही. थ्रासियन आहे आणि ग्रीकांचा कशावरही विश्वास नसतो असे समजणे चुकीचे आहे. उलट जगातील सर्वोत्कृष्ट आणि सर्वात समृद्ध गोष्टींविषयी ग्रीकांना नेहमी आदरच वाटत आला आहे.' त्यावर ती म्हणाली, 'ग्रीक काय मानतात याची मला पर्वा नाही; पण आमच्या जमातीत आम्ही जें करतो ते तू करशील का? तू माझ्या ओठात आपले ओठ, श्वासात आपले श्वास आणि आत्म्यात आपला आत्मा मिसळशील का? मग मीही तुला तसेच करीन. तसे केल्यामुळे आपले आत्मे एकमेकात मिसळतील. आणि आपली शरीरे दोन असली तरी आपण एक व्यक्ती बनून राहू. तू घाबरतोयस का?' तिने विचारले. तो म्हणाला, 'मी कुठल्या गोष्टींना घाबरतो हे तुला माहीत नाही का?'

त्यांच्या खोलीच्या फरशीवर टाकलेल्या एका पातळ चादरीवर ती दोघे पहुडलेली असतात. कोठडीसारखी असलेली ही खोली हेच त्यांचे घर, तोच त्यांचा महाल. त्यांचे सर्व सहजीवन. पाच फूट रुंदीच्या आणि सात फूट लांबीच्या दगडांनी उभारलेल्या त्या कोठडीत फक्त एक भांडे आणि एक चादर एवढेच सामान होते. पण तेही त्यांचे नव्हते. काहीच त्यांचे नव्हते. ती दोघेही एकमेकांची नव्हती. त्याच्या कुशीत पडून ती त्याच्या चेहऱ्यावरून आणि अंगावरून अलगद हात फिरवीत राहिली आणि तिला गदगदून आले. तिला हुंदक्यावर हुंदके फुटू लागले. कुणी पाहिले असते तर त्यांचा विश्वास बसला नसता. लोक तिला शिष्ट समजत, गर्विष्ठ समजत. तिला रडताना कुणीही पाहिले नव्हते.

आज उगवणारी सकाळ कदाचित स्पार्ताकुसच्या आयुष्यातील शेवटची सकाळ ठरू शकेल. या जाणिवेने व्हरिनिया अधिकच व्याकूळ आणि हळवी झाली. पहाटेच्या पहिला धूसर प्रकाश त्यांच्या कोठडीत पसरू लागला होता. त्याचबरोबर भूतकाळाच्या स्मृतीही तिच्या मनात पाझरू लागल्या होत्या. तिला आठवले बातियातुसने तिला पाचशे देनारी मोजून विकत घेतले होते. तिच्याकडे पाहिल्यानंतर बातियातुस एकदम खूष झाला होता. एका वेगळ्याच उत्साहाने भरून गेला होता. आतूर झाला होता. त्यावेळी ती अवघी वीस-एकवीस वर्षांची असावी. खूपच उंच होती ती आणि तरीही अतिशय डौलदार. तिचे पिवळे केस आणि विशाल मस्तक यामुळे तिचे देखणेपण असामान्य वाटत असे. त्या नशेतच

बातियातुसने तिला विकत घेतली. नंतर जेव्हा त्याने तिचा उपभोग घेण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्याने अनुभवली रानमांजरासारखी तिची हिंस्त्रता. तिने त्याला लाथा घातल्या, त्याच्यावर थुंकली, त्याला ओरबाडले व लांब नखांच्या एखाद्या राक्षशिणीप्रमाणे ती त्याच्या अंगावर धावून गेली. दोघांच्या झटापटीत त्याच्या शयनगृहातील अनेक किमती वस्तूंची मोडतोड झाली. त्याचा राग अनावर झाला आणि अखेर तिला बेशुद्ध करण्यासाठी त्याने ग्रीसमधून आणलेली एक सुंदर कुंडी तिच्या डोक्यात घातली. खरे तर तो तिला ठारच मारणार होता. पण मुळात तिच्यासाठी दिलेले पाचशे देनारी व आतचा हा सगळा मोडतोडीचा खर्च लक्षात घेता तिला ठार मारणे त्याला परवडणारे नव्हते. तो अगदी हाडाचा व्यापारी होता. म्हणून त्याने आपला राग आवरून सूड म्हणून तिला स्पार्ताकुसच्या ताब्यात दिले.

स्पार्ताकुसविषयी त्याच्या मनात एक अकारण नावड निर्माण झाली होती. बाहेरून शेळीसारखा बुजरा वाटणारा स्पार्ताकुस आतून प्रज्वलित होता आणि त्याच्यातल्या त्या ज्वालेला सगळे योद्धे मान देत असत. काट्याने काटा काढावा या हेतूने बातियातुसने व्हरिनियाला स्पार्ताकुसच्या ताब्यात देऊन टाकले. या पुढे ही स्त्री तुझी आहे. तुझी शय्यासोबती. तिच्या उदरात मूल जन्माला घाल किंवा घालू नकोस तो तुझा प्रश्न आहे. पण तिला तुझ्या आज्ञांचे पालन करायला लाव. पण तिला जखमी करू नकोस किंवा तिच्या सौंदर्याला बट्टा लागेल अशा प्रकारची इजा करू नकोस. अशा प्रकारच्या सूचना देत त्याने तिला त्याच्या ताब्यात दिले. तेव्हा स्पार्ताकुस शांतपणे उभा होता. अत्यंत थंड नजरेने तो त्या जर्मन मुलीकडे बघत होता. त्या विशिष्ट क्षणी व्हरिनिया सुंदर वाटत नव्हती. तिच्या चेहऱ्यावर दोन मोठे वळ उमटले होते. एक डोळा सुजलेला होता. तिचे कपाळ, मान आणि दंडावर हिरवे निळे वळ होते. 'बघ, मी तुला काय देतोय ते.' असे म्हणून बातियातुसने तिचा आधीच फाटलेला पोषाख पूर्णत: फाडून टाकला. आता ती संपूर्ण नग्नावस्थेत स्पार्ताकुससमोर उभी होती. स्पार्ताकुसने तिच्याकडे पाहिले आणि ती त्याला एकदम आवडून गेली. तिच्या नग्नतेमुळे नव्हे, तर अंगावर कपडा नसूनही ती नग्न वाटत नव्हती. तिने स्वत:चे अंग लपवण्याचा काहीही प्रयत्न केला नाही. हात दुमडले नाहीत, साध्यासुध्या दिमाखात ती उभी होती. कुठलीही व्यथा किंवा अपमान तिच्या चेहऱ्यावर जाणवत नव्हता. ती स्पार्ताकुस किंवा बातियातुस यांपैकी कुणाकडेही बघत नव्हती. ती जणूकाही स्वत:मध्ये समावून गेली होती. तिची नजर, आत्मा, तिची स्वप्ने जणूकाही तिच्या शरीरापेक्षा पूर्णपणे वेगळी होती. तिचे स्वत:वर पूर्ण नियंत्रण होते. आपले आयुष्य तिने गुलामीला बहाल केले होते. त्यामुळे ते कुचकामी ठरले होते. तिच्या डोळ्यात या निरर्थक आयुष्याबद्दलचा अलिप्त भाव स्पष्टपणे दिसत होता. म्हणूनच स्वत:च्या नग्नतेने ती गांगरून गेली नाही. तिच्या या वेगळेपणामुळेच स्पार्ताकुसचे हृदय तिने जिंकले.

(त्या रात्री कोठडीच्या एका कोपऱ्यात ती मुटकुळे करून झोपली. त्याने कुठल्याही प्रकारे तिला छेडण्याचा प्रयत्न केला नाही. उत्तर रात्री जेव्हा गारठा वाढला तेव्हा तो एवढेच म्हणाला, 'ए मुली, तुला लॅटिन बोलता येते का?' तिने अर्थातच काहीही उत्तर दिले नाही. मग तोच म्हणाला, 'मी तुझ्याशी लॅटिन बोलत जाईन कारण मला जर्मन बोलता येत नाही.' गारठा वाढतच चाललेला आहे. तू या चादरीवर झोप.' तिने हु का चू केले नाही. त्याने चादर तिच्या दिशेने ढकलली. सकाळ झाली तेव्हा तिने पाहिले त्या दोघांच्या मध्ये चादर तशीच पडलेली होती आणि रात्रभर कोठडीतल्या कातळावरच ती दोघे झोपली होती. पण तिच्या वाट्याला विचारपूर्वक आपुलकी दाखविण्याचा हा पहिलाच क्षण होता. बालपण निघून गेले आणि एक दिवस ती तरुण झाली. त्यानंतर तिला जबरदस्तीने जर्मनीच्या जंगलामध्ये पळवून नेण्यात आले. तेव्हापासून आजतागायत तिच्या वाट्याला आल्या होत्या त्या यातना, त्यामुळे आपुलकीचा हा पहिला क्षण तिच्या आठवणीत खोलवर रुतून राहिला.)

◆◆◆◆

सकाळ झाली. सर्व योद्धे दक्ष झाले. आजची सकाळ वेगळीच होती. प्रत्येकाला माहीत होते, की आज योद्ध्यांच्या दोन जोड्या प्राणांतिक झुंज देणार आहेत. उष्ण रक्त वाळूवर सांडणार आहे. रोमवरून दोन तरुण भरपूर पैसे घेऊन आलेले आहेत. त्यांना चित्तथरारक असे काही तरी हवे आहे. दोन थ्रासियन, एक ज्यू आणि एक आफ्रिकन असे योद्धे निवडण्यात आलेले आहेत. आफ्रिकन योद्धा जाळे व काटा वापरण्यात तरबेज आहे. इतरकांकडे फक्त कट्यारी असतील. अशा प्रकारची विषम झुंज सहसा होत नाही. अन्य कुणी रिंगण मालकाने अशी झुंज होऊ दिली नसती. पण बातियातुस लालची आहे. पैशांसाठी तो काहीही करु शकतो. खरे तर, एखाद्याने कुत्रा पाळला व त्याला भरपूर खाऊ घालून धष्टपुष्ट केले तरी कुणी कुत्र्याला सिंहाशी झुंज द्यायला उभे करीत नाही. पण बातियातुस काहीही करू शकतो.

कृष्णवर्णीय योद्धा - ड्राबा सकाळी उठला आणि आपल्या बोलभाषेत स्वगत पुटपुटला - 'हे मृत्यूची मोहर घेऊन आलेल्या दिवसा, मी तुझे स्वागत करतो.' चादरीवर बसल्याबसल्या तो विचार करू लागला. जगातील सर्व माणसे, मग ती किती का हलाखीच्या स्थितीत असेना, आठवणींचा खजिना जपत असतात. आठवणी - प्रेमाच्या आणि आपुलकीच्या, खेळाच्या, चुंबनाच्या, आनंदांच्या, गाण्यांच्या आणि नृत्यांच्या आठवणी. सर्वांनाचा मृत्यूची भीती वाटते. आयुष्य अगदी कुचकामी आणि निरर्थक झाले तरी माणसे जीवनाला चिकटूनच राहातात. कितीही एकाकी असोत, घरापासून कितीही दूर असोत , अपमान, यातना, क्रौर्य यांचा कितीही सामना करावा लागो, पशुसारखी वागणूक मिळून, पुन्हा घरी जायला मिळण्याची कोणतीही आशा नसो, इतरांच्या करमणुकीसाठी हा असा झुंजीत भाग घ्यायला लागो, तरीही माणसे जीवनाला चिकटूनच राहातात.

एकेकाळी तोही एक प्रामाणिक, संसारी गृहस्थ होता. त्याचेही घर होते. बायको होती. मुले होती. त्याचाही एक आवाज होता, जो शांतीच्या काळी ऐकून घेतला जायचा. आणि आता? त्याच्या हातात मासे पकडण्याचे एक जाळे देण्यात आले होते आणि तीन टोके असलेला एक गळ आणि त्याला झुंजीसाठी तयार करण्यात आले होते. लोक त्याच्याकडे बघून हसणार होते. टाळ्या पिटणार होते.

त्याचे अंग दुखून आले. दिवसाला सामोरे जाण्यासाठी म्हणून तो उभा राहिला तेव्हा त्याला रिकामे रिकामे वाटू लागले. आपली मन:शांती ढळली आहे असे वाटू लागले. स्पार्ताकुस बरोबर झुंज द्यायची आणि त्याला ठार मारायचे या विचारावर त्याचे शरीर आणि मन काही केल्या केंद्रित होईना. स्पार्ताकुस - ज्याच्यावर त्याचे प्रेम आहे आणि ज्याला तो त्या ठिकाणच्या सर्व गोऱ्या माणसांमध्ये सर्वाधिक मान देतो, त्याला ठार मारायचे? पण असे म्हटले जाते - 'दोन योद्धे एकमेकांचे मित्र असू शकत नाहीत.'

◆◆◆◆

बातियातुस पाहुण्यांची वाट बघत रिंगणात थांबला होता. रोमन लोकांविषयी त्याची व्यक्तिगत मते काहीही असली तरी त्यांच्या श्रीमंतीसमोर तो नतमस्तक होत असे. ते नुसते नावाला लखपती-करोडपती नव्हते तर लाखो-करोडो खर्च करण्याची त्यांची शक्ती होती. त्यांच्यासमोर त्याला आपण डबक्यातला एक बेडूक आहोत असे वाटे. त्यामुळेच कायुस आणि ब्राकुस आणि त्यांच्या मैत्रिणींची वाट पाहात तो तिथे उभा होता. पाहुणे आल्यानंतर मोठ्या अदबीने त्याने खास बनविलेल्या प्रेक्षक कक्षाकडे त्यांना नेले. हा कक्ष खास त्यांच्यासाठीच बनविण्यात आला होता. बसल्या ठिकाणाहून रिंगणाचा कोपरा न् कोपरा त्यांना दिसावा, अशा प्रकारे आसनांची मांडणी केली होती. मऊ मऊ गाद्यागिर्द्या तिथे ठेवण्यात आल्या होत्या. शीतल वाईनची व्यवस्था होती. सुकामेवा होता. सूर्यप्रकाशाची झळ लागू नये याची खबरदारी घेण्यात आली होती आणि उष्मा लागलाच तर वारा घालण्यासाठी पक्ष्यांच्या पिसांचे पंखे घेऊन दोन गुलाम दोन बाजूला उभे होते. अशी सगळी उत्तम तजवीज ठेवल्याबद्दल बातियातुस स्वत:वर खूश होता.

''कुठली वाईन आहे.'' एका पाहुण्याने विचारले.

''सिझल पाईन.'' बातियातुस प्रौढीने म्हणला. एक तळवा नाकाजवळ ठेवून ब्राकुस नाजूकपणे थुंकला.

''जुदेयन वाईन नाही का?''

''आहे ना.'' बातियातुसने ओरडून एका गुलामाला जुदेयन वाईन आणायला सांगितले.

ब्राकुसची बायको त्याच्या कानाशी काहीतरी कुजबुजत होती. ब्राकुस तिच्याकडे झुकला तिचा हात हातात घेऊन त्याने तो आपल्या ओठांवर दाबला. ''प्रिये मला न सांगण्यासारखे काही आहे काय?''

''मी ते तुमच्या कानात सांगेन.'' ती कुजबुजली. ब्राकुसने लगेच बातियातुसला फर्मान सोडले. 'झुंज सुरू होण्याआधी त्या ज्यू योद्ध्याला आमच्यासमोर हजर करा.'' लगेच बातियातुसने तसा संदेश पाठवला. काही मिनिटातच ज्यू योद्धा हजर झाला. त्याच्या अंगावर अजूनही एक ढगळ लोकरी अंगरखा होता. त्याचे डोळे फिक्कट हिरवे होते. छोट्या चकाकत्या खड्यांसारखे ते दिसले. डोळे उघडे असूनही त्यात दृष्टी नव्हती. तो कुठेही बघत नव्हता. नुसताच उभा होता.

त्यांच्याबरोबर असलेल्या स्त्रिया शहारल्यासारख्या झाल्या. कायुसही घाबरला. आयुष्यात पहिल्यांदाच असा योद्धा साखळदंडाविना किंवा पिंजऱ्याविना त्यांच्यासमोर हाताच्या अंतरावर उभा झाला होता. दोन प्रशिक्षक त्याच्या आजूबाजूला उभे होते. पण खवळला असता तर त्याला आवरणे त्यांना शक्य नव्हते. बाकदार हिंस्त्र नाक. कवटी दिसण्याइतके मुंडन केलेले. छोटासा चेहरा. बलदंड स्नायू, हिरवे डोळे.... हा काही माणूस वाटत नाही.

''त्याला तो अंगरखा काढायला सांगा.'' ब्राकुसने फर्मान सोडले.

''काढून टाक.''

बातियातुस पुटपुटला. काही क्षण स्तब्धतेत गेले. अकस्मात अंगरखा गळून पडला. ज्यू योद्धा आता त्यांच्यासमोर नग्न उभा होता. त्याचे पिळदार स्नायू आणि गतीहीनता यामुळे तो एखाद्या ब्राँझच्या पुतळ्यासारखा दिसत होता. कायुस स्तिमित होऊन पाहात राहिला. ब्राकुस वैतागल्याचे नाटक करीत होता. त्याची बायको तोंड विस्फारून पाहात होती. तिचा श्वास जड झाला होता.

''पुरे आता.''ब्राकुस कंटाळून म्हणाला. ज्यू खाली वाकला. त्याने अंगरखा अंगावर ओढून घेतला. तो वळला आणि चालू लागला. दोन प्रशिक्षक मागे मागे जाऊ लागले.

''पहिली झुंज याची होऊ द्या.'' ब्राकुसने पुन्हा फर्मान सोडले.

◆◆◆◆

एका मोठ्या ताटामध्ये शस्त्रे घेऊन दोन गुलाम आखाड्यात गेले. तिथे ते स्तब्धपणे उभे राहिले. आखाड्याच्या बाजूला असलेल्या छोट्या दालनात दोन थ्रासियन आणि एक कृष्णवर्णीय योद्धाअसे तिघे बसून होते. ज्यू परत येण्याची वाट पाहात होते. तिथल्या शांततेची कोंडी अखेर कृष्णवर्णीयाने फोडली.

''ईश्वराची आपल्यावर कृपा असती, तर लहानपणीच आपण मरून गेलो असतो.''

''तसे नाही.'' स्पार्ताकुस म्हणला.

''तुझा देवावर विश्वास आहे का?'' कृष्णवर्णीयाने स्पार्ताकुसला उद्देशून प्रश्न विचारला.

''नाही''

''मग तुझा विश्वास आहे तरी कशावर, स्पार्टाकुस?'' कृष्णवर्णीयाने पुन्हा विचारले.

''माझा तुझ्यावर विश्वास आहे, माझा माझ्यावर विश्वास आहे.''

''तू आणि मी...'' तरुण, देखणा थ्रासियन पोलेमुस म्हणाला.

''बातियातुस नावाच्या खाटकाच्या टेबलावर कापण्यासाठी ठेवलेले आपण मांस आहोत.''

''स्पार्टाकुस, आणखी कशाकशावर तुझा विश्वास आहे.'' कृष्णवर्णीयाने विचारले.

''आणखी कशावर? माणूस कसली स्वप्ने पाहातो. मृत्यूच्या समीप आलेला माणूस कशाचे स्वप्न बघतो?''

''या आधीच सांगितलेली एक गोष्ट मी तुला सांगतो.'' कृष्णवर्णीय योद्धा अतिशय मृदूपणे म्हणाला. त्याचा आवाज छातीत घुमल्यासारखा वाटत होता. त्यात एक दु:ख दडलेले आहे, असे जाणवत होते.

''मी फार एकाकी आहे. माझ्या घरापासून फार दूर आहे आणि आता पुन्हा संसारी माणूस होऊ शकणार नाही, इतका कडवट बनलो आहे. याउपर मला जगायचे नाही, कॉम्रेड.''

''हे काय दया दाखवण्याचे ठिकाण आहे का?''

''पण हे थकवा येण्यासारखे ठिकाण नक्कीच आहे आणि मी थकलोय.''

''माझा बापही गुलाम होता.'' स्पार्टाकुस म्हणाला. ''आणि त्याने मला एकच सद्‌गुण शिकवला. गुलामाचा एकमेव गुण म्हणजे त्याचे जिवंत असणे.''

''आपण दोघेही एकाचवेळी जिवंत राहू शकणार नाही, कुणातरी एकाला मरावे लागेल.''

''गुलामाला असलेला एकमेव दिलासा म्हणजे इतरांप्रमाणेच त्याला आपल्या मृत्यूचा क्षण माहीत नसतो.''

त्यांचे हे संभाषण सुरू असतानाच ज्यू योद्धा परतला. तो गप्पच होता. एरवीही तो काही बोलत नसे. दालनाच्या आत येऊन तो उभा राहिला. दु:खातिरेकाने आणि शरमेने त्याची मान खाली गेली होती. तेवढ्यात बिगुल वाजले. तरुण थ्रासियन योद्धा उभा राहिला. त्याचा खालचा ओठ तणावामुळे कंप पावत होता. दोन्ही योद्ध्यांनी आपापले अंगरखे बाजूला काढले. दालनाचे दार उघडले व दोन्ही योद्धे नग्नावस्थेत झुंजीच्या रिंगणाकडे जाऊ लागले.

कृष्णवर्णीय योद्ध्याला या सगळ्यात आता काहीच स्वारस्य राहिले नव्हते. आतापर्यंत ५२ वेळा त्याने जाळे आणि भाला या हत्यारांनिशी झुंज दिली होती आणि तरीही तो जिवंत होता. आता त्याला जीवनाशी बांधून ठेवणारे धागेच तुटल्यासारखे झाले होते. पण स्पार्टाकुस उत्सुक होता. जिवंतपणा हेच त्याचे लक्षण होते. तो उठला आणि दालनच्या एका फटीला त्याने डोळा लावला. तिथून रिंगणाचे दृश्य दिसत होते. दोन्ही योद्धे रिंगणाच्या मध्यापर्यंत चालत जाताना त्याला दिसले. त्यांचे चेहरे पाहुण्यांच्या बाजूला होते. त्या पाहुण्यांनी त्यांचे

रक्त आणि मांस विकत घेतले होते. योद्धे चालत जाताना त्यांच्या सावल्या त्यांच्यामागे फरफटत जाताना स्पार्ताकुसला दिसल्या. त्यांची शरीरे तेलाने तुकतुकत होती. मध्यभागी पोहोचल्यानंतर ते एकमेकांपासून दहा पावले दूर गेले. हत्यारांचे ताट घेऊन उभा असलेला गुलाम आणि प्रशिक्षक आता पुढे झाले. त्या ताटामध्ये दोन कट्यारी होत्या. किमान बारा इंची कट्यारी असाव्यात त्या. त्यांची धार सूर्यप्रकाशात चकाकत होती. त्या कट्यारीचा नुसता स्पर्शही त्वचा छिलून काढण्यास पुरेसा होता.

प्रशिक्षकाने चांदीची शिट्टी वाजवली. दोन्ही योद्धे एकमेकांसमोर उभे झाले. आपल्या कपड्यांबरोबर त्यांनी आपले माणूसपणही जणू उतरवून ठेवले होते. दोन हिंस्त्र जनावरे समोरासमोर उभी ठाकावीत तसे वाटत होते. परस्परांचा अंदाज घेत ते एकमेकांभोवती काही काळ वर्तुळाकार फिरले. एका निर्णायक क्षणी दोघे एकमेकांना भिडून एखादी प्रतिक्षिप्त क्रिया व्हावी तसे अकस्मात एकमेकांपासून दूर गेले. आता ज्यू योद्ध्याच्या छातीवर एक लांबलचक रक्तरेषा दिसू लागली. रोमन पाहुणे खुश झाले. प्रोत्साहनपर चीत्कार काढू लागले.

योद्ध्यांना आता कसलेही भान राहिले नव्हते. त्याचे संपूर्ण लक्ष परस्परांवर केंद्रित झाले होते. काळ थांबल्यासारखा झाला होता. एकमेकांचा अंदाज घेत ते संधीची वाट बघत होते. अकस्मात ते पुन्हा एकदा परस्परांना भिडले. संपूर्ण शक्तीनिशी आणि अत्यंत निर्धारपूर्वक केलेली ती हालचाल होती. एका योद्ध्याच्या डाव्या हाताने दुसऱ्या योद्ध्याचा उजवा हात पकडलेला होता. त्यांची शरीरे एकमेकांना भिडलेली होती. चेहरे समोरासमोर होते. दोघांच्याही नजरेत खुन्नस चढलेली होती. परस्परांविषयीचा तिरस्कार तेवढा शिल्लक राहिलेला होता. दोघांनाही एकच दृश्य दिसत होते. समोरच्या शत्रूचा नायनाट. जणूकाही ते दोघे मिळून एकच व्यक्तित्व निर्माण झाले होते. आतून दुभंगलेले एक अख्खे व्यक्तित्व.

सहन होईपर्यंत दोघांची पकड कायम राहिली व एका क्षणी दोघे दोन दिशांना फेकले गेले. आता थ्रासियन योद्ध्याच्या दंडावर पेटत्या ज्वालेसारखी रक्ताची एक रेषा दिसत होती.

एकमेकांपासून ते दहाबारा पावले दूर उसळले होते. धापा टाकत दोघेही काही क्षण उभे राहिले. त्यांची तेलकट शरीरे रक्त आणि घामाने माखली होती. जखमांमधून रक्ताचे थेंब त्यांच्या पायालगतच्या वाळूवर पडत होते.

अकस्मात थ्रासियन योद्ध्याने हल्ला चढवला. हातातली कट्यार उंचावत त्याने ज्यू योद्ध्यावर झेप घेतली. ज्यू एका गुडघ्यावर बसला. कट्यारीचा हल्ला त्याने चुकवला आणि थ्रासियन योद्ध्याचे मनगट पकडून त्याने त्याला हवेत भिरकावून दिले. तो जमिनीवर पडण्याच्या क्षणीच ज्यू त्याच्या छाताडावर होता. झुंजीमधील हा सर्वात चित्तथरारक आणि आत्यंतिक उत्तेजन निर्माण करणारा क्षण होता. थ्रासियनच्या नजरेसमोर मृत्यू ठाकला होता. ज्यूच्या कट्यारीचे आघात चुकवण्याची त्याने खूप धडपड केली. गडाबडा लोळण्याचा

प्रयत्न केला. कट्यार ज्यूच्या हातातून सुटावी यासाठी लाथाही झाडून पाहिल्या पण त्याला ते फटके चुकवता आले नाहीत. त्याच्या अंगावर दिसेल तेथे एकामागोमाग एक कट्यारीचे घाव घालत होता. तरीही थ्रासियन योद्ध्याची धडपड इतकी तीव्र होती की, ज्यूला प्राणांतिक घाव घालताच येईना. अखेर एका झटक्यासरशी थ्रासियन योद्ध्याने आपले सर्व बळ आपल्या पायामध्ये एकवटून ज्यू योद्ध्याला अंगावरून फेकून दिले आणि तो आपल्या पायांवर उभा राहिला. त्यासाठी त्याने जी शक्ती वापरली त्यामुळे तो हेलपाटत गेला. हातात कट्यार घट्ट पकडून ठेवली.

ज्यू योद्ध्याने त्याच्या जवळ जाण्याचा प्रयत्न केला नाही. त्याची गरजही राहिली नव्हती. थ्रासियन योद्धा पुरता जखमी झाला होता. त्याचा चेहरा रक्ताळला होता. शरीरावर सर्वत्र जखमा झाल्या होत्या. त्याच्या पायाजवळ रक्ताचे थारोळे साचले होते. पण प्रेक्षकांना पाहिजे होते ते जीवन मृत्यूचे थैमान. त्यांनी आरडाओरडा सुरू केला. ज्यू योद्ध्याने शेवटचा प्राणांतिक हल्ला करावा म्हणून ते पुकारा करू लागले. पण ज्यू ढिम्म हलला नाही. अकस्मात त्याने आपल्या हातातील कट्यार वाळूत फेकून मारली. ती तिथे रूतून काही क्षण थरथरत राहिली. खाली मान घालून तो ठामपणे उभा राहिला.

नग्नावस्थेतील थ्रासियन योद्धा संपूर्ण रक्ताळलेल्या अवस्थेत उभा होता. अकस्मात तो एका गुडघ्यात वाकला. त्याच्या हातातील कट्यार वाळूवर पडली. तोही पूर्णत: कोलमडला. मृत्यू झपाट्याने त्याला आपल्या ताब्यात घेत असल्याचे दिसत होते. रोमन पाहुणे उत्कंठेने वेडेपिसे झाले होते. त्यांचा उत्साह पाहून एक प्रशिक्षक रिंगणात घुसला. ''मूर्खा झुंज चालू ठेव.'' तो ओरडला आणि त्याने चाबुक फटकारला. पण ज्यू योद्ध्याने अजिबात हालचाल केली नाही. तिकडे थ्रासियन योद्धा जमिनीवर गडाबडा लोळू लागला. त्याच्या कण्हण्याचे रुपांतर हळूहळू मोठमोठ्याने विव्हळण्यात झाले. एका क्षणी त्याने आपल्या शरीराची धनुराकृती केली आणि तो निपचित पडला. त्याचे विव्हळणे थांबले. प्रशिक्षकाचा चाबुकही थांबला.

आता कृष्णवर्णीय योद्धाही स्पार्ताकुसच्या बाजूला फटीला डोळा लावून उभा राहिला होता. एक शब्दही न बोलता रिंगणातील दृश्य ते पाहात होते.

रिंगणाबाहेरील सैनिक आता आत शिरले. त्यांनी आपल्या भाल्यांनी त्याला डिवचून पाहिले. थोडी हालचाल करून थ्रासियन योद्धा पुन्हा निपचित पडला. एका सैनिकाने आपल्या पट्ट्याला अडकवलेला एक छोटा पण अत्यंत अवजड असा हातोडा बाहेर काढला. दुसऱ्या सैनिकाने थ्रासियन योद्ध्याच्या अंगाखाली भाला घालून त्याला सरळ केले. त्यानंतर पहिल्या सैनिकाने आपल्या हातोड्याने थ्रासियन योद्ध्याच्या कपाळावर एक जबरदस्त फटका दिला. तो आघात इतका जबरदस्त होता, की हातोडा कवटी भेदून आत गेला. त्या रक्तमाखल्या हातोड्यानेच सैनिकाने प्रेक्षकांना सलाम ठोकला. तोपर्यंत दुसऱ्या प्रशिक्षकाने

रिंगणात एक गाढव आणले होते. त्या गाढवाच्या डोक्यावर पक्ष्यांच्या पिसांचा एक मुकूट होता आणि त्याच्या पाठीभोवती गुंडाळण्यात आलेल्या चामड्याच्या पट्ट्याला एक लोखंडी साखळी लावलेली होती. ती साखळी थ्रासियन योद्ध्याच्या पायांना बांधण्यात आली. सैनिकांनी गाढवावर चाबकाचे फटके मारताच ते रिंगणभर फिरले आणि त्याच्यामागोमाग रक्ताळलेला तो मृतदेह फरफटत गेला. रोमन पाहुण्यांनी टाळ्या वाजवून आपला आनंद व्यक्त केला आणि त्यांच्या बरोबरच्या स्त्रियांनी आपले हातरुमाल हवेत उडवले.

नंतर रक्तमाखल्या वाळूवर दुसरी वाळू टाकण्यात आली. रिंगण स्वच्छ करण्यात आले. पुढची झुंज होईपर्यंत इथे संगीताच्या तालावर नर्तिकांची पावले थिरकणार होती.

बातियातुस पाहुण्यांच्या कक्षाकडे धावला. त्याला वाटले की ज्यू योद्ध्याने तरुण थ्रासियनला स्वत:च्या हाताने ठार न मारल्यामुळे पाहुणे रागावले असतील, पण तसे काही घडले नाही. पाहुणे खूष होते. ब्राकुस म्हणाला, ''ज्यूने उत्तम खेळ केला आहे. त्याला आहे त्या स्थितीत इथे आणा.'' थोड्याच वेळात ज्यू हजर झाला.

''ए, खाली वाक तू.'' ब्राकुसने फर्मान सोडले. ज्यू ढिम्म हलला नाही. ''वाक'' बातियातुस ओरडला. तिथे असलेल्या दोन प्रशिक्षकांनी रोमन पाहुण्यांसमोर त्या योद्ध्याला जबरदस्तीने गुडघ्यांवर बसायला लावले. त्याच्या पाठीकडे बोट दाखवत ब्राकुस उत्साहाने ओरडत म्हणाला, ''बघा, तिथे बघा. नाही नाही चाबकाचे वळ नव्हे, एखाद्या तरुणीच्या नखांनी ओरखडा पडावा तशी जी रक्तरेषा आहे, ती थ्रासियनच्या कट्यारीची खूण आहे.'' नंतर ब्राकुस बातियातुसला उद्देशून म्हणाला, ''त्याला आणखी फटके मारू नका. त्याने उत्तम खेळ केला आहे. मी स्वत: यापुढे बड्या लोकांमध्ये त्याची प्रशंसा करणार आहे. तेव्हा बातियातुस त्याची काळजी घे. तो तुला भरपूर पैसे मिळवून देईल.''

या सगळ्या जल्लोषात ज्यू योद्धा खालमानेने मुकाट उभा होता.

◆◆◆◆

''आपण अगदी उलट्या काळजाचे आहोत. ज्या स्थितीत आपण जगतो आहोत, तशी अवस्था भोगायला लागली तर फत्तरही रडतील. वाळू सुद्धा वेदनेने हंबरडा फोडेल पण आपल्याला मात्र रडू येत नाही.'' कृष्णवर्णीय तळमळीने बोलत होता.

''आपण योद्धे आहोत. आपल्याला ग्लॅडिएटर्स म्हणतात.'' स्पार्ताकुस म्हणाला.

''तुझे हृदय दगडाचे आहे काय?''

''मी गुलाम आहे. मला असे वाटते, की गुलामाला एकतर दगडाचे हृदय असावे किंवा हृदयच नसावे. तुला तरी चांगला भूतकाळ आहे. जुन्या स्मृतींमध्ये तू रमू शकतोस. मी कोरु वंशाचा आहे. आठवण्याच्या लायकीचे आमच्या पिढ्यान्‌पिढ्या काहीच घडलेले नसते.''

''म्हणूनच का हे सगळे पाहूनही तुझ्या मनाची जराही चलबिचल होत नाही?''

''मला अस्वस्थ होऊन चालणार नाही.'' स्पार्ताकुस कंटाळल्यासारखा बोलला.

''मला तुझे काही कळत नाहीय, स्पार्ताकुस. तू श्वेतवर्णीय आहेस व मी काळा. आपले वर्ण वेगळे आहेत. आमच्या देशात माणसाचे हृदय दु:खाने भरून आले की तो रडतो. तुम्हा थ्रासियन लोकांचे अश्रूच आटूले आहेत बघ. माझ्याकडे पाहा बघू जरा. काय दिसत तुला?''

''मला एक माणूस रडताना दिसतो आहे.'' स्पार्ताकुस म्हणाला.

''आणि त्यामुळे मी कमअस्सल ठरतो का? स्पार्ताकुस, मी तुला निक्षून सांगतो मी तुझ्याबरोबर युद्ध करणार नाही.''

''आपण झुंज केली नाही, तर दोघांनाही ते मारून टाकतील.'' स्पार्ताकुसने हळूच त्याला वस्तुस्थितीची जाणीव करून दिली.

''तसे असेल तर मला मारून टाक, माझ्या मित्रा! मला जगण्याचा कंटाळा आला आहे. जीवन नकोसे झाले आहे.''

''गप्प राहा मूर्खांनो''! बाहेर उभे असलेल्या सैनिकांनी त्यांच्या कक्षावर हातोड्याने मोठ्ठा आवाज करीत बजावले. कृष्णवर्णीय योद्ध्याने आपली भली मोठ्ठी मूठ एवढ्या जोराने भिंतीवर आपटली की, ते अख्खे दालन हादरल्यासारखे झाले. मग तो एकदम शांत झाल्यासारखा तिथल्या बाकड्यावर बसला आणि त्याने आपला चेहरा आपल्या ओंजळीत लपवला. स्पार्ताकुस त्याच्याजवळ गेला आणि त्याचे मस्तक वर उचलून त्याने अतिशय हळूवारपणे त्याच्या भुवयांवरील घामाचे थेंब आपल्या बोटांनी निपटून काढले.

''एक योद्धा दुसऱ्या योद्ध्याचा कधीच मित्र असू शकत नाही.''

''स्पार्ताकुस, मला एक सांग - माणूस कशासाठी जन्माला येतो?'' दु:खाच्या आवाजात कुजबुजत त्याने प्रश्न केला.

''जगण्यासाठी.''

''हेच संपूर्ण उत्तर आहे का?''

''हे एकमेव उत्तर आहे.''

''मला तुझ्या उत्तराचा अर्थ कळत नाहीए, थ्रासियन.''

''का, काय झाले, माझ्या मित्रा?'' स्पार्ताकुसने त्याला समजवण्याचा प्रयत्न केला.

''शेंबड्या पोरालाही हे उत्तर माहीत असते. गर्भातून नुकत्याच बाहेर आलेल्या अर्भकालाही हे माहीत असते. अत्यंत स्वाभाविक असे उत्तर आहे.''

''माझ्यासाठी हे उत्तर नाही.'' कृष्णवर्णीय म्हणाला. ''ज्यांचे ज्यांचे माझ्यावर प्रेम होते, त्या सर्वांसाठी माझे हृदय तिळतिळ तुटते आहे.''

''आम्ही सारे तुझ्यावर प्रेम करत राहू.''

''यापुढे ते शक्य नाही.''

◆◆◆◆

रिंगणातील दृश्य कायुस नजरेत साठवून घेत होता. कृष्णवर्णीय आफ्रिकन योद्ध्याच्या समोर थ्रासियन वंशाचा स्पार्ताकुस किती छोटा वाटत होता. उभय योद्ध्यांनी एकमेकांना सलामी दिली. इकडे रोमन पाहुणे वाईनचे घुटके घेत होते. सुकामेवा चघळत होते. एवढ्यात शस्त्रे घेऊन एकजण आला. स्पार्ताकुससाठी कट्यार आणि कृष्णवर्णीयसाठी मासे पकडण्याचे जाळे आणि तीन टोके असलेला एक लांबलचक जड काटा.

योद्ध्यांनी आपापली शस्त्रे हातात घेतली आणि नंतर एकदम आक्रीतच घडले. कायुस पाहातच राहिला. कृष्णवर्णीयाच्या त्या कृतीला वेडेपणा एवढाच एक शब्द लागू पडत होता. त्याने आपल्या हातातील जाळे फेकून दिले. युद्धात काढतात तसा एक मोठा, हाळी दिल्यासारखा आवाज काढला. धावतच तो प्रेक्षकसज्जाकडे वळला आणि वर चढण्याचा प्रयत्न करू लागला. हातात नंगी तलवार असलेल्या एका प्रशिक्षकाने त्याला थांबविण्याचा प्रयत्न केला तर त्याने आपल्या हातातील त्रिधारी काट्याने असा फटका लगावला की तो प्रशिक्षक हवेत उडाला आणि अनेक वळसे घेत किंकाळ्या मारत जमिनीवर पडाला. प्रेक्षकसज्जाभोवती सहा फुटांचे कुंपण होते. त्यावर लावलेले लोखंडी फलक त्याने कागदासारखे टरकावून टाकले. त्याच्या अचाट शक्तीमुळे तो स्वत:च जणूकाही एक हत्यार बनला होता आणि ते हत्यार सुसाटत रोमन पाहुण्याच्या दिशेने येत होते.

सैनिकांनी चारही बाजूने रिंगणाला वेढा घातला. एका सैनिकाने व्यवस्थित पवित्रा घेऊन आपले दोन्ही पाय वाळूत घट्ट रोवले आणि कृष्णवर्णीयाच्या दिशेने लोखंडी टोकाचा लाकडी भाला फेकून मारला. रोमन सैनकाचा तो भाला शेकडो देशाच्या सैनिकांना वठणीवर आणणारा, त्यांना सुतासारखे सरळ वागायला लावणारा, पण तो भालाही कृष्णवर्णीयाला रोखू शकला नाही. त्याच्या पाठीचा वेध त्या भाल्याने घेतला. लोखंडी टोक त्याच्या छातीत घुसून समोरून बाहेर आले. तरीही तो थांबला नाही. भाल्याच्या लाकडी भागाचे वजन पाठीवर लीलया झेलत तो रोमन पाहुण्यांच्या दिशेने पुढे सरकत राहिला. दुसरा भाला त्याच्या बरगड्या फाडत गेला. तिसऱ्या भाल्याने त्याच्या पाठीचा पुन्हा वेध घेतला आणि चौथा त्याच्या मानेत घुसला. तरीही त्याच्या हातातला काटा रोमन पाहुणे बसलेल्या कक्षाच्या कठड्यापर्यंत पोहोचलाच होता. पाहुण्यांची पाचावरधारण बसली होती. आणि त्याच अवस्थेत रक्ताचा पाट वाहात असताना त्याने अखेरचा श्वास घेतला.

कायुस पाहात होता. इतका सारा वेळ स्पार्ताकुस जारही हलला नाही. हालचाल केली असता तर तो मेला असता. त्याने आपली कट्यार वाळूत रुतवून ठेवून तो अविचलपणे उभा राहिला. जिवंत असणे हेच माणसाचे जीवनाला दिलेले उत्तर असते.

◆◆◆◆

# ४. योद्धा गुलामांचा उठाव

सकाळी सकाळी ड्रम वाजू लागला. हे व्यायामासाठीचे बोलावणे होते. चाळीस मिनिटे धावायचे, तेही ठरलेल्या रिंगणात. त्यानंतर नाश्ता मिळायचा. उठल्याबरोबर प्रत्येकाला एक ग्लास थंड पाणी दिले जायचे. त्यांच्यातल्या ज्या योद्ध्यांबरोबर स्त्रिया असायच्या त्यांना कोठडी धुवून काढायची परवानगी दिली जात असे. त्यानंतर इतर कामगारांबरोबर ठरवून दिलेली कामे करण्यासाठी त्या स्त्रिया जायच्या. लेन्तुलुस बातियातुसच्या संस्थेत कुठलीही गोष्ट वाया घालवायची नाही हा नियमच होता. योद्ध्यांच्या स्त्रिया धुणीभांडी, स्वयंपाकपाणी, शेळ्या राखणे, स्नानगृहातील कामे करणे, बगिच्याची काळजी घेणे आदी कामे करीत. एखाद्या मळेवाल्यासारखा बातियातुस त्यांच्या बाबतीत कडकपणे वागायचा. त्याचा चाबुक त्यांच्या पाठीवरून मुक्तपणे लहरायचा. पण स्पार्ताकुस आणि व्हरिनिया या दोघांबद्दल त्याच्या मनात एक कुतुहलमिश्रित भय होते. आपल्याला त्यांची भीती का वाटते हे मात्र त्याला काही केल्या कळत नव्हते.

त्या दिवशीची सकाळ वेगळी आणि संस्मरणीय होती. आदल्या दिवशीची झुंज, कृष्णवर्णीयाने रिंगणात केलेले बंड, त्याचा मृत्यू या सगळ्याचे सावट होते. योद्धा प्रशिक्षण शाळेत एक विचित्र अस्वस्थता होती. गुलामांवर देखरेख ठेवणारे अधिकारी आणि योद्धांना प्रशिक्षण देणारे माजी लष्करी अधिकारी यांचे नेहमीचे वागणे बदलले होते. त्यात एक प्रकारच्या घृणेचा संचार झाला होता. त्या घृणेपोटीच गुलामांना एक लोखंडी कुंपणासमोर रांगेत उभे करण्यात आले. या ठिकाणी कृष्णवर्णीयाला क्रुसावर लटकावून ठेवण्यात आले होते. स्त्रियांवरही आज चाबकाचे फटकारे जरा जोरातच बसत होते. आज व्हरिनियाचीही कुणाला भीती वाटत नव्हती. उलट स्पार्ताकुसवरून तिच्यावर मुक्ताफळे उधळण्यात आली. चाबकाचे फटकेही तिला इतरांपेक्षा जास्त खायला लागले आणि स्वयंपाकघरातील कधीच न संपणाऱ्या कामाचा रगाडा उपसण्यासाठी तिला पिटाळण्यात आले.

हा सगळा बातियातुसच्या संतापाचा परिणाम होता. अर्थात त्याला राग येणे साहजिक होते. त्याचे आर्थिक नुकसान झाले होते. दुसऱ्या जोडीची झुंज न झाल्यामुळे ब्राकुसने अर्धी रक्कम दिलीच नव्हती. आता कोर्ट कचेऱ्याही होतील. पण प्रसिद्ध रोमन घराण्याविरुद्ध रोमच्या न्यायालयात खटला जिंकणे किती कठीण होते हे बातियातुसला माहीत होते. त्यामुळे तो रागावला होता. त्याच्या रागाचे पडसाद सर्वत्र उमटत होते. स्वयंपाकघरात आचारी तिथल्या सहाय्यक स्त्रियांना शिवीगाळ करू लागले. काहींनी त्यांना दंडुक्यांनी मारहाणही केली. प्रशिक्षकांनी योद्ध्यांना चाबकांनी फोडून काढले. सैनिकांनी भोसकून मारलेल्या कृष्णवर्णीय योद्ध्याला लटकवून ठेवण्यात आले. सकाळी कवायतींसाठी बाहेर पडताना

त्यांना ते प्रेत दिसावे अशी व्यवस्था करण्यात आली. सर्वत्र दहशतीचे वातावरण निर्माण करण्यात आले होते.

योद्ध्यांच्या निवासस्थानाबाहेर दोन रांगांमध्ये ते सगळेजण उभे होते. स्पार्ताकुसच्या एका बाजूला गानिकुस होता. दुसऱ्या बाजुला गॉल वंशाचा क्रिक्सुस होता. समोर उभे असलेले प्रशिक्षक आज सशस्त्र होते. त्यांच्याकडे कट्यारी आणि तलवारी होत्या. शिवाय नियमित सैनिकांच्या चार तुकड्याही तैनात करण्यात आल्या होत्या. या चाळीस सैनिकांकडे ढाल-तलवारी होत्या. सकाळचा सूर्य उबदार बनत चालला होता. पण स्पार्ताकुसच्या हृदयात जराही ऊब शिल्लक राहिली नव्हती. समोरच्या सर्व हालचाली टिपत असलेला गानिकुस त्याच्या कानात कुजबुजला, ''हे काय चाललेय, तुला कळले का?'' स्पार्ताकुसने अवाक्षरही न काढता नकारार्थी मान हलवली.

''तुमची झुंज झालीच नाही का?'' क्रिक्सुसने विचारले.

''नाही.''

''पण त्याने तर त्यांच्यापैकी कुणला ठार मारले नाही आणि एखाद्या माणसाला मरायचेच असेल तर तो याहून चांगल्या रीतीने मरू शकतो.''

''तुझा मृत्यू यापेक्षा चांगल्या रीतीने होणार आहे का?'' स्पार्ताकुसने विचारले.

''तो तर कुत्र्यासारखा मेलाच, पण तुही तसाच मरशील. तो कोथळा फुटून वाळूत पडला आणि मेला आणि तुझीही तशीच अवस्था होणार आहे.'' क्रिक्सुसने त्याला डिवचले.

स्पार्ताकुसचे विचारचक्र सुरू झाले. आपण काय करायला हवे याची त्याला स्पष्ट जाणीव झाली. आतापर्यंत जे त्याला कळले होते, ते नेमक्या वास्तवाच्या रुपात त्याच्यासमोर उभे झाले. त्याला एक सत्य सापडले. ही फक्त सुरूवात होती. पुढचे सगळे भवितव्याच्या पोटात दडलेले होते. जे सत्य त्याला जाणवले ते त्याच्या बाबतीत घडलेल्या सगळ्या घटना, त्याच्या भोवतालच्या माणसांच्या आयुष्यातील सगळे प्रसंग आणि आता जे घडणार होते त्या सगळ्याशी संबद्ध होते. त्याच्या समोरच कृष्णवर्णीयाचा विशाल देह लटकत होता. चाबकाच्या फटक्यांनी ठिकठिकाणी त्वचा फाटून मांस बाहेर आले होते. रक्त साकळून गेले होते आणि त्याचे मस्तक त्याच्या रूंद खांद्याच्या मधोमध लोंबकळत होते.

स्पार्ताकुसचे विचारचक्र सुरूच होते. जीवनाविषयीची किती घृणा या रोमन लोकांना आहे. किती सहजपणे ते माणसाला मारून टाकतात. एखाद्याच्या मृत्यूमुळे किती हावरा आनंद होतो त्यांना. त्यांच्या जीवनाची अख्खी इमारत गुलामाच्या रक्त आणि हाडांवर उभी आहे. त्यामुळेच हत्येचे त्यांना एवढे आकर्षण वाटत असावे. प्रेत क्रुसावर लटकवण्याचा तर त्यांना छंदच होता. खरे तर ही प्रथा कार्थेजमधून आली होती. गुलामाला लटकावून मारणेच योग्य आहे असे कार्थेजियन लोकांना वाटे. रोमन लोकांनी ही प्रथा स्वीकारली आणि मग तिचे त्यांना जणू व्यसनच जडले.

एवढ्यात बातियातुस तिथे आला. ओठांची जराही हालचाल न करता स्पार्ताकुसने गॉल वंशियाला प्रतिप्रश्न केला - ''आणि तू कसा मरणार आहेस?''

''तुझ्याप्रमाणेच थ्रासियन!''

''तो माझा मित्र होता. त्याचे माझ्यावर प्रेम होते.'' मृत निग्रोविषयी स्पार्ताकुस म्हणाला.

''लोक तुझ्यावर प्रेम करतात हाच तर तुला शाप आहे.''

''बातियातुसने योद्ध्यांना उद्देशून आपले भाषण सुरू केले - ''मी तुम्हाला जेवू घालतो. उत्तम प्रकारचे अन्न देतो. बकरा, कोंबडी, ताजी मासळी खाऊ घालतो. पोट फुटेपर्यंत तुम्ही जेवता. तुमच्या आंघोळीची इथे व्यवस्था आहे. मसाजची व्यवस्था आहे. तुम्हाला मी खाणींमधून आणि सुळांवरून सोडवून आणले. इथे तुम्ही आरामात आहात. आलात तेव्हा तुमची अवस्था इतकी वाईट होती की त्याहून अधिक वाईट काही असूच शकत नव्हते. आता तुम्ही आरामात आहात आणि सर्वोत्कृष्ट अन्न खात आहात.''

''तू माझा मित्र आहेस का?'' स्पार्ताकुस गॉलच्या कानात कुजबुजला.

गॉलने हलकेच उत्तर दिले - ''योद्धा कधीच योद्ध्याचा मित्र असू शकत नाही.''

''पण मी तुला मित्रच समजतो.'' स्पार्ताकुसने उत्तर दिले.

बातियातुसचे भाषण सुरूच होते - ''त्या काळ्या कुत्र्याच्या काळ्या हृदयात कृतज्ञतेचा अंशही नव्हता. हरामखोर होता तो. तुमच्यापैकी कितीजण तसे आहेत?''

योद्ध्यांनी हूं की चूं केले नाही.

''एका कृष्णवर्णीयाला घेऊन या.'' बातियातुस प्रशिक्षकांना उद्देशून म्हणाला. आफ्रिकन योद्धे उभे असलेल्या ठिकाणी प्रशिक्षक धावतच गेले आणि त्यांनी एकाला ओढून बाहेर काढले. त्याला कवायत शाळेच्या मधोमध उभे करण्यात आले. सगळे काही आधीच ठरले होते. त्याप्रमाणे ड्रम वाजू लागले. दोन सैनिक आपल्या रांगेतून बाहेर पडून त्या योद्ध्याच्या आगेमागे उभे राहिले. एकामागून एक त्यांनी त्या योद्ध्याला पुढून आणि मागून भोसकण्यास सुरुवात केली. काही वेळाने कृष्णवर्णीय योद्धा वाळूत उताणा पडला तरीही त्यांचे भोसकणे चालूच होते. आपल्या बाजूला उभ्या असलेल्या अधिकाऱ्याकडे वळून बातियातुस म्हणाला - ''याउपर आणखी गोंधळ होणार नाही. कुत्रे गुरगुरणारही नाहीत.''

''मी तुला मित्र मानतो'' गानिकुस स्पार्ताकुसला म्हणाला. गॉल वंशीय क्रिक्सुस बाजूलाच उभा होता. तो काहीही बोलला नाही. मात्र त्याचा श्वास जड झाला.

नंतर सकाळची कवायत सुरू झाली.

◆◆◆◆

घटना मोठी होती. झुंजीतल्या एका योद्ध्याने झुंज सोडून खानदानी रोमन पाहुण्यांवर हल्ला करण्याचा प्रयत्न करणे हा एकूणच रोमन जनतेच्या दृष्टीने मोठा गुन्हा होता. सिनेटच्या

सदस्यांची चौकशी समिती नेमण्यात आली. सुनावणीच्यावेळी बातियातुसला बोलवण्यात आले. त्याने असा दावा केला की ही घटना म्हणजे योगायोग होता. त्यामागे कट कारस्थान वगैरे काही नव्हते. इतकेच नव्हे तर तसे कट कारस्थान रचणेही शक्य नव्हते. तशी काही आखणी झालीच असती तर आपल्याला कळले असते. योद्ध्यांमध्ये आपले किमान दोन खबरे असतात अशी माहिती त्याने यावेळी दिली. या खबऱ्यांना गुप्तपणे आपण वेगळा पगार देतो. माहिती देणे हेच त्यांचे काम असते. योद्ध्यांमधल्या आपापसातल्या गप्पांची सुद्धा ते माहिती देतात. याबदल्यात त्या दोघांची अधूनमधून मैत्रीपूर्ण झुंज लावून देण्यात येते. त्यातील एकाला मुक्त करण्यात येते. दुसरा किरकोळरित्या जखमी होतो. त्यानंतर नवीन खबऱ्याची भरती करण्यात येत. एवढी व्यवस्था असल्यामुळे कट रचणे शक्य नाही आणि रचला तर त्याची माहिती आपल्याला मिळाल्याशिवाय राहणार नाही, असे बातियातुसने सांगितले.

असेच व्हायचे. कितीतरी वेळा गुलामांनी बंड केले. पण ते कधीच उघडकीस आले नाही. त्याचे मूळ शोधण्याचा कुणी कधी प्रयत्न केला नी. मग ते सिसिलीमधील मोठे बंड असो किंवा एखाद्या मळ्यातील निष्फळ विद्रोह असो. शे-शंभर गुलामांना सुळावर चढवून सगळे काही शांत व्हायचे. मुळे उखडून काढण्याचा सिनेटचा प्रयत्न कधीच यशस्वी झाला नाही. माणसांनी वैपुल्य, समृद्धी आणि सुखसमाधानाचे टोक गाठले होते. शांती हा परवलीचा शब्द होता. लढाई हा शब्द देशाच्या शब्दकोशात शिल्लक राहिला नव्हता. रोमच्या रस्त्यांमुळे देशादेशांमधील विभाजन नष्ट झाले होते आणि जगाचे शक्तिशाली नागरी मध्यकेंद्र असलेल्या रोममध्ये सारेजण खाऊनपिऊन सुखी होते आणि तरीही फुलाफळांनी भरलेल्या या समृद्धीच्या झाडाला असा एक रोग झाला होता ज्याची मुळे उखडून काढता येत नव्हती.

सिनेट सदस्याने बातियातुसला विचारले - ''कट कारस्थान, असमाधान, गुप्त योजना यापैकी कशाचीही चिन्हे तुम्हाला जाणवली नाहीत का?''

''तसे काही नव्हतेच.'' तो ठामपणे म्हणाला.

''स्पार्ताकुस, गानिकुस आणि क्रिक्सुस या त्रिकुटाला बाहेरून कुठलीही मदत किंवा चिथावणी नव्हती का? कुणी त्यांना पैसे तर पुरविले नाहीत ना?''

''मी सर्व देवांची शपथ घेऊन सांगतो, असा काहीही प्रकार घडलेला नाही.'' बातियातुसने निक्षून सांगितले.

◆◆◆◆

अर्थात ईश्वराची साक्ष काढून सांगण्यात आलेले हे काही पूर्ण सत्य नव्हते. कुठलाही माणूस कधीही पूर्ण एकटा नसतो. स्पार्ताकुसचे हेच अदम्य शक्तिस्थान होते, की तो स्वत:ला कधीही एकटा समजत नसे आणि कधीही स्वत:ला स्वत:मध्ये बंदिस्त करून घेत नसे. झुंजीच्या वेळी बंड करण्याचा हा प्रकार घडला त्या आधी काही काळ सिसिलीमधील तीन

मळ्यांवर गुलामांनी उठाव केला होता. या बंडात नऊशे गुलाम सहभागी झाले होते. मूठभर वगळता इतर सर्वांना फासावर लटकवण्यात आले. हा सगळा रक्तपात घडून गेल्यानंतर जमीनदारांच्या लक्षात आले, की एवढ्या गुलामांना फासावर लटकवल्यामुळे त्यांच्या खरेदीत घालवलेले हजारो देनारी वाया गेले आहेत. नंतर उरल्यासुरल्यांना मातीमोल किमतीत फुंकून टाकण्यात आले. या गर्दीत बातियातुसच्या एजंटनी रुंद खाद्याच्या अवाढव्य लालसर केसांच्या गॉल वंशीय क्रिक्सुसला हेरला. असे गुलाम सुधारण्याच्या पलिकडे गेलेले असतात अशी कल्पना असल्यामुळे त्यांची किंमतही कमी असते.

बातियातुसच्या एजंटांनी या संधीचा फायदा घेऊन क्रिक्सुसला विकत घेतले. त्यात काही धोका आहे असे ओस्तियाच्या गोदीतील दलालांनाही वाटले नाही. त्यामुळे त्यांनी क्रिक्सुसच्या मूळ वंशाविषयी काही सांगितले नाही.

स्पार्ताकुस एकटा नव्हता. विद्रोहाचे जे वस्त्र विविध धाग्यांनी गुंफले जात होते, त्या धाग्यांपेक्षा तो कुणी वेगळाही नव्हता. क्रिक्सुसची कोठडी त्याच्या बाजूलाच होती. संध्याकाळी अनेकदा जमिनीवर पूर्ण अंग सैलावून पडलेला असताना त्याचे डोके कोठडीच्या दारापाशी असे. क्रिक्सुसने सांगितलेल्या सिसिलियन गुलामांच्या अखंड बंडाच्या कहाण्या त्याने ऐकलेल्या होत्या. हा विद्रोह अर्धशतकापूर्वी सुरू झाल्याचे त्याला माहीत होते. स्पार्ताकुस स्वत: गुलाम होता व त्याचे कूळही गुलामाचे होते. पण त्याही वंशात एकिल्स आणि हेक्तर हे वीर आणि ओदिसेउससारखा विचारवंत जन्माला आलेला होता. गुलाम जरी देहमनाने माणसांसारखे दिसले तरी त्यांना माणसांसारखी वागणूक कधीच मिळाली नाही. ते जणू काही अर्धमानव अर्धपशू होते. नग्न गुलाम बाजारात गाढवांपेक्षाही स्वस्तात मिळत. पण या गुलामांमध्येही मोठमोठे शूरवीर होऊन गेले. एनुसने एका बेटावरील सर्व गुलामांना मुक्त केले. रोमन लष्कराच्या तीन पलटणींचा त्याने चक्काचूर केला. नंतर तो मारला गेला. ग्रीक वंशाचा अन्दार्त, जगावेगळा ज्यू बेन जोआश यांनी अचाट पराक्रम गाजवले. बेन तर कार्थेजमधून एका गलबतात बसून पळून गेला व आपल्या गुलाम सेनेसह अथेनियनला जाऊन मिळाला.

या सगळ्या कहाण्या ऐकून स्पार्ताकुसचे हृदय गर्वाने आणि आनंदाने फुलून जायचे. वेगवेगळ्या लढायांमध्ये मारले गेलेले हे वीर आपले कुणीतरी लागतात अशी भावना त्याच्या मनात निर्माण होत असे. बंधुतेची एक उदात्त जाणीव त्याच्या शरीर-मनावरील दास्याचा कलंक धुवून काढत असे. त्याचे मन तासन्तास या शूरवीरांबरोबर बोलत राही. आपण त्यांना पूर्णपणे ओळखतो असे त्याला वाटत असे. त्यांच्या भावना, त्यांची स्वप्ने, त्यांचे ध्यास आपल्याला कळतात अशी ग्वाही त्याचे मन देत असे. वंश, शहर किंवा राज्य या शब्दांना काही अर्थ नसतो. या शब्दांच्या बंधनापेक्षा मुक्तीसाठी लढणाऱ्यांचे बंधन सार्वत्रिक असते. खरे नाते याच मुक्तियोद्ध्यांशी असते. एकीकडून या बंडाची भव्यता त्याला

जाणवायची आणि दुसरीकडून त्यांच्या सततच्या अपयशाचे वास्तवही त्याला वाकुल्या दाखवत राहायचे. बंड कितीही भव्य असो, कधीतरी त्याचा कणा मोडायचा. सगळ्या बंडांची अखेर अशीच व्हायची. रोमन सैनिक गुलामांना क्रुसावर लटकवून द्यायचे. प्रत्येक नव्या बंडाचे नवे फलित हेच असायचे. गुलामी न स्वीकारणाऱ्या गुलामाचे शेवटी काय होते ते दाखवून देण्यासाठी क्रुसावरील लटकते देह पुरेसे असायचे.

''सगळ्या बंडांची अखेर ही अशीच'' क्रिक्सुस म्हणाला.

योद्धा म्हणून जगताना क्रिक्सुस फारच कमी बोलायचा. भाडोत्री योद्ध्याला भूतकाळ किंवा भविष्यकाळाचा विचार करून उपयोग नसतो. त्याने फक्त वर्तमानात जगावे. क्रिक्सुसने स्वत:भोवती कडवटपणाची एक भिंत उभी केली होती. त्यून त्याच्या मनापर्यंत जाण्याची हिंमत फक्त स्पार्ताकुसमध्ये होती. एकदा तो चिडून म्हणाला देखील - ''स्पार्ताकुस, तू फार मित्र जोडतो बुवा! मित्राला ठार मारणे कठीण असते. मला माझ्या एकांतात राहू दे.''

त्या दिवशी सकाळी कवायतीनंतर नाश्त्याच्या आधी सर्व योद्ध्यांना कवायत शाळेमध्ये एकत्र ठेवण्यात आले होते. हवेत उष्मा होता. सगळेच घामाने नितळत होते. काहीजण बसले होते. काही छोटे-छोटे गट करून उभ्याने बोलत होते. क्रुसावर लटकवलेल्या दोन आफ्रिकन गुलामांचे मृतदेह त्याच्या नजरेसमोरच होते. त्यामुळे त्यांचे बोलणे तुटकतुटक होते. क्रुसावरील एकाला तर आजच ठार करण्यात आल्यामुळे त्याच्या पायाशी ताज्या रक्ताचे थारोळे साचले होते. काही पक्षी येऊन त्या रक्ताची चव घेत होते. योद्ध्यांमध्ये औदासिन्यतेचे वातावरण होते. काळ मोठा कठीण होता. बातियातुस खवळलेला असल्याने तो नवनवीत कंत्राटे घेणार आणि त्यांची लवकरात लवकर वासलात लावणार हे उघड होते.

ओढ्याच्या काठी असलेल छोट्याशा झाडांच्या राईत सैनिक जेवणासाठी विखुरले होते. आपल्या कोठडीतून स्पार्ताकुसला ते दिसत होते. त्यांची शिरस्त्राणे काढून ठेवली होती. त्यांची अवजड हत्यारे म्यानात बंद केलेली होती. स्पार्ताकुसची नजर त्या दृश्यावरून एक क्षणभरही हलत नव्हती.

क्रिक्सुस दुखावलेला होता. त्याच्या आत बराच काळ हिंसा कोंडून राहिली होती. त्याने विचारले, ''तू काय पाहतोयस, स्पार्ताकुस?''

''मला माहीत नाही.''

''पण तुला सारे काही माहीत आहे आणि म्हणूनच थ्रासियन तुला तात म्हणतात.''

''तू कुणाचा तिरस्कार करतोयस क्रिक्सुस?''

''तो कृष्णवर्णीय देखील तुला तात म्हणून हाक मारायचा का, स्पार्ताकुस? तू त्याच्या बरोबर झुंज का केली नाहीस? आपली पाळी येईल तेव्हा तू माझ्याशी लढशील स्पार्ताकुस?''

''यापुढे मी कुठल्याही योद्ध्याशी लढणार नाही.'' स्पार्ताकुस ठामपणे म्हणाला.

''मला ते माहीत आहे. काही क्षणापूर्वी माहीत नसले तरी आतां माहीत झाले आहे.''

त्याचे शब्द ऐकून सहासातजण त्याच्या भोवती जमले. तो आता सैनिकांकडे पाहात नव्हता. त्याऐवजी तो आपल्या सहकारी गुलाम-योद्ध्यांकडे पाहू लागला. अगदी जवळून त्याचे चेहरे न्याहाळू लागला. आणखी काही जण जमा झाले. तो काहीही बोलत नव्हता. पण त्यांचे नैराश्य आपोआप निवळत गेले. त्यांच्या डोळ्यात एक आवाहक उत्तेजन दिसू लागले. त्याने आळीपाळीने प्रत्येकाच्या नजरेला नजर भिडवली.

''आता आपण काय करायचे, तात?''

''काय करायचे ते आपल्याला वेळ येताच कळेल. सध्या एकमेकांपासून दूर व्हा.''

थ्रासियन गुलामांना एक हजार वर्षांची परंपरा आहे. या दीर्घ काळात जे घडले नाही ते पुढील चार तासांमध्ये घडायचे होते. पण आता या क्षणी ते सारे गुलाम होते. सगळेजण रांगेत कवायत शाळेच्या प्रवेशद्वाराबाहेर निघून भोजन कक्षाच्या दिशेने शिस्तीत चालू लागले. नेमक्या त्याच क्षणी बातियातुस आपल्या आलीशान डोलीतून चालला होता. आठ गुलामांनी ती डोली आपल्या खांद्यावर पेलली होती. त्याचा हिशोबनीसही आत बसला होता. कापुआच्या बाजारपेठेत खरेदीसाठी ते चालले होते. गुलामांची शिस्त पाहून बातियातुसच्या मनात आले, की एका आफ्रिकन गुलामाला ठार केले हे ठीकच झाले. थोडे नुकसान झाले असले ती तो खर्च काही वाया गेला नाही. त्यांची डोली कापुआच्या दिशेने अंतर कापत राहिली.

◆◆◆◆

भोजनालयात काय झाले, योद्धे जेवताना काय बोलले, हे कळायला काही मार्ग नाही. कारण गुलामांच्या हालचाली टिपणारे इतिहासकार त्या काळी नव्हते. किंबहुना इतिहासाने दखल घ्यावी इतपत त्यांचे जीवन महत्त्वाचे आहे असेही तेव्हा कुणाला वाटत नव्हते.

व्हरिनिया स्वयंपाकघरात काम करीत होती. तिने काहीतरी पाहिले आणि ते इतरांना सांगितले. अशा गोष्टी लगेच पसरतात. फार मोठा बोभाटा झाला नाही तरी जी कुजबुज होती ती काही पूर्णपणे नष्ट होत नाही. भोजनालयाच्या एका टोकाला स्वयंपाकघर होते. जेवणाच्या वेळी भोजनालयाची इतर दारे बाहेरून लावली जात. त्या दिवशीही तसेच झाले. योद्धे जेवायला बसताच दोन सैनिकांनी सगळी दारे बाहेरून बंद केली. स्वयंपाक घरातील गुलाम स्त्रियांनी जेवण वाढायला सुरुवात केली. चार प्रशिक्षक तेवढे आत होते. त्यांच्याकडे सुरे होते. शिवाय चामड्याचे छोटे चाबुकही होते. बाहेरून कड्या लावणारे दोन सैनिक वगळता इतर सैनिक शंभर यार्डांवर दूर असलेल्या वनराईमध्ये रमतगमत नाश्ता करीत होते.

स्पार्ताकुसच्या नजरेतून हे सगळे सुटले नाही. त्याचे खाण्याकडे लक्ष नव्हते. त्याचे हृदय उसळ्या मारत होते आणि घशाला कोरड पडली होती. त्याचे विचारचक्र सुरू होते. तो आणि इतर गुलाम यांना कसलेही भवितव्य नाही हे त्याला स्पष्ट दिसत होते. अशा

अवस्थेत काही माणसे या निकर्षापर्यंत येतात की, अमूकअमूक गोष्ट आपण केली नाही तर यापुढे जगण्यातच काही अर्थ राहाणार नाही. निर्णयाच्या या बिंदूपर्यंत जेव्हा अनेक माणसे एकाच वेळी येतात तेव्हा पृथ्वीही कापून उठते.

सर्व योद्ध्यांशी आपण बोलले पाहिजे अशी एक प्रभावी भावना स्पार्ताकुसच्या मनात निर्माण झाली. गॉल वंशीय क्रिक्सुसला त्याने हे सांगितले. त्याचे लक्ष किचनकडे गेले. त्याची बायको व्हरिनिया स्टोव्हजवळ उभी राहून त्याच्याकडे बघत होती. इतर योद्धेही त्याच्याकडे बघत होते. ज्यू वंशाच्या डेव्हिडने त्याच्या ओठांची हालचाल पाहून त्याला काहीतरी महत्त्वाचे बोलायचे आहे हे ताडले. त्याचे शब्द आपल्या कानी पडावे म्हणून गानिकुस त्याच्याजवळ रेलून बसला. फ्रेशस हा आफ्रिकन गुलामही त्याच्याजवळ सरकला.

स्पार्ताकुस म्हणाला, ''मला माझे हृद्य उघड करायचे आहे. पण मी जेव्हा बोलेन तेव्हा हे इथले प्रशिक्षक मला थांबवण्याचा प्रयत्न करतील. पण मी थांबणार नाही. यापुढे आपल्याला मागे वळून पाहात येणार नाही.''

''ते तुला थांबवू शकणार नाहीत.'' लाल केसांचा विशालकाय क्रिक्सुस त्याला पाठिंबा देण्यासाठी म्हणाला.

त्याचे शब्द भोजनालयात घुमले. दोन प्रशिक्षकांनी मागे वळून पाहिले. स्पार्ताकुसभोवती इतर योद्धे जमा होत होते. त्यांनी चाबुक फडकावले आणि सुरे बाहेर काढले.

''तुम्ही आमच्यावर चाबुक फडकावता, आम्ही कुत्रे आहोत की काय?'' आफ्रिकन योद्ध्याने गुरकावत विचारले.

स्पार्ताकुस उठून उभा राहिला. त्याच्याबरोबर डझनभर योद्धेही उठून उभे राहिले. प्रशिक्षकांनी सुरे उगारून त्यांना आव्हान दिले. पण योद्ध्यांनी क्षणार्धात गळे आवळून त्यांना ठार केले. हे सगळे इतक्या अल्पावधीत झाले की फारसे आवाजही झाले नाहीत. स्वयंपाकघरात गुलाम महिलांनी आचाऱ्याला ठार केले. त्यानंतर स्पार्ताकुसने आपला पहिला हुकूम दिला. सौम्य, शांत आणि कोणतेही दडपण नसलेल्या स्वरातला तो पहिला आदेश होता. क्रिक्सुस, गानिकुस, डेव्हिड आणि फ्रेशस या चौघांना उद्देशून ते फर्मान होते.

''दरवाज्यापाशी जा आणि राखण करा. मला बोलायचे आहे.''

एक क्षणभरच ते थबकले आणि नंतर लगेच त्यांनी त्याच्या हुकुमाचे पालन केले. त्यानंतर आपोआपच त्याच्याकडे नेतृत्व आले आणि त्याचा शब्द त्यांनी त्यानंतर कधीही खाली पडू दिला नाही. त्यांचे त्याच्यावर प्रेम जडले होते. क्रिक्सुसला माहीत होते, की यानंतर आपण मरणार आहोत. पण त्याला त्याची पर्वा वाटत नव्हती. आतापर्यंत अलिप्त असलेल्या डेव्हिड या ज्यू योद्ध्यालाही स्पार्ताकुसविषयी आपुलकी वाटू लागली. शेळीसारख्या चेहऱ्याच्या आणि फुटक्या नाकाच्या या कुरूप, विक्षिप्त आणि शांत थ्रासियनविषयी आपल्याला

अकस्मात अतीव प्रेम वाटू लागले आहे, याची जाणीव डेव्हिडला झाली. त्याच्या सर्वांगातून उबदार ऊर्जास्त्रोत वाहू लागले.

◆◆◆◆

''माझ्या जवळ या.'' स्पार्ताकुस उभा राहून पहिले वाक्य बोलला. त्याच्या या आदेशाचेही त्वरित पालन झाले. दाराबाहेरच्या सैनिकाना कसलीही कुणकुण लागलेली नव्हती. सगळे योद्धे आणि स्वयंपाक घरातील ३० महिला आणि २ पुरुषांसह बत्तीस गुलाम त्याच्याभोवती जमा झाले. व्हरिनिया अवाक् होऊन त्याच्याकडे बघत होती. तिच्या नजरेत भीती आणि आशा यांचे विचित्र मिश्रण होते. ती तीरासारखी त्याच्या दिशेने निघाली. त्याने आपला एक हात तिच्याभोवती टाकून तिला जवळ घेतले. ''आणि आता मी मुक्त आहे. माझे वडील किंवा आजोबांना स्वातंत्र्याचा एक क्षणही अनुभवता आला नाही. पण मी मात्र आता इथे या क्षणी एक मुक्त माणूस म्हणून उभा आहे.'' आपण स्वतंत्र आहोत या कल्पनेनेच त्याला एक नशा चढली. पण त्याबरोबरच भीतीची एक लाटही त्याच्या शरीरात पसरत गेली. स्वतंत्र असणे ही काही सामान्य गोष्ट नाही. पिढीजात गुलामगिरीनंतर स्वातंत्र्याचा अनुभव घेणे ही काही साधी गोष्ट नाही. स्पार्ताकुसमध्ये सुप्तावस्थेत एक दहशतही साठली होती. या दहशतीला विरोध करायचा निर्णय त्याने घेतला होता. या निर्धारात कधीच बदल होणार नव्हता. या वाटेवर प्रत्येक पावलागणिक मृत्यू दबा धरून बसला आहे याची त्याला जाणीव होती. अनेक प्रश्नांचे भुंगे त्याला पोखरत होते. आपल्या भोवतालचे योद्धे हे ही गुलाम आहेत. आज त्यांनी आपल्या मालकांचे प्रतिनिधी असलेल्या प्रशिक्षकांना ठार केले आहे. एका प्रकारे साक्षात मृत्यूला आव्हान दिले आहे. या सगळ्यांना मृत्यूच्या खाईतून बाहेर काढणे, एक निश्चित वाट दाखवणे हेही त्याचे काम होते. त्या सर्वांचे डोळे त्याच्यावर लागले होते. एक साधासुधा थ्रासियन खाण कामगार - स्पार्ताकुस. पण त्यांच्या हृदयात काय चालले आहे ते त्याला नेमके कळायचे. तो मनकवडा होता. अज्ञान आणि अंधश्रद्धा यांनी वेढलेल्या या गुलामांना असे वाटू लागले की, कुठल्यातरी वेगळ्याच दैवताला आपली दया आली आहे आणि गुलामगिरीतून आपली मुक्तता करण्यासाठी त्या देवाने स्पार्ताकुसला स्पर्श केला. एखाद्या शिक्षित माणसाने पुस्तक वाचावे तेवढ्या सहजतेने स्पार्ताकुसने सगळ्यांचे भविष्य वाचावे आणि त्या दिशेने सर्वांना न्यावे अशी अपेक्षा त्यांच्या मनात निर्माण झाली. भविष्याच्या दिशेने जाण्यासाठी रस्ते नसतील तर त्याने ते तयार करावेत.. स्पार्ताकुसला त्यांच्या डोळ्यात त्यांच्या या सर्व भावना स्पष्टपणे दिसू लागल्या.

''तुम्ही माझी माणसे आहात ना?'' त्याने विचारले. ''यापुढे मी कधी भाडोत्री योद्धा म्हणून काम करणार नाही. प्राण गेले तरी बेहत्तर. तुम्ही माझी माणसे आहात ना?''

सगळे त्याच्याभोवती जमा झालेले होते. काहीच्या डोळ्यात अश्रू तरळत होते. ते त्याच्या

अधिकच जवळ गेले. घबराट तर होतीच. काही जण खूपच बावरलेले होते. पण त्याने एका प्रखर आशेचा स्पर्श त्या सर्वांना घडवून आणला होता.

''आता आपण सगळे साथी आहोत.'' घोषणा केल्यासारखे तो बोलला.

''आता आपण सगळे जर मिळून जणू एकच माणूस आहोत. जुन्या काळात आमच्या थ्रासियन टोळीत जेव्हा योद्धे लढाईवर जायचे तेव्हा सगळे मिळून, ठरवून, स्वेच्छेने निघायचे. रोमन सैनिकांसारखे जबरदस्तीने नव्हे आणि जर एखाद्याला लढाईवर जायचे नसेल तर तो दूर व्हायचा. त्याला तसे करण्याचे स्वातंत्र्य असायचे.''

''आता आम्ही काय करायचे आहे?'' गर्दीतून एकाने विचारले.

''आपण बाहेर जाऊन लढाई करायची आहे. आपण जगातील सर्वोत्कृष्ट लढवय्ये आहोत. बाहेर जाऊन आपण उत्तम झुंज देऊ शकतो.'' त्याचा आवाज वाढला होता. त्याचा नेहमीचा सौम्यपणा जाऊन तो हिंस्त्र बनला होता. ''आपण अशी झुंज देऊ की, रोमच्या इतिहासाला कापुआच्या लढवय्यांचा कधीच विसर पडणार नाही.''

शेवटी असा क्षण येतोच की, जेव्हा माणसे निर्णायक कृती करतात. तसेच घडले होते. व्हरिनियालाही त्याची जाणीव झाली. एका वेगळ्याच आनंदाचा संचार तिच्यात झाला. तिचा ऊर अभिमानाने भरून आला. जगावेगळा हा माणूस माझा आहे या जाणिवेने तिची छाती फुलून गेली. स्पार्टाकुस तिला ओळखू आला. कालांतराने सगळे जग त्याला ओळखणार होते. एका शक्तिशाली, अंतहीन पर्वाची ही सुरुवात आहे हे तिला अगदी लख्खपणे जाणवले. माझा स्पार्टाकुस शांत, शुद्ध व शक्तिशाली. असा माणूस अख्ख्या जगात नाही.

◆◆◆◆

''पहिल्यांदा सैनिकांवर हल्ला करा.'' स्पार्टाकुसने आदेश दिला. कुणीतरी म्हणाले, ''पाचाला एक असे त्यांचे प्रमाण आहे आणि कदाचित ते पळून जातील.''

''ते पळून जाणार नाहीत.'' स्पार्टाकुस रागाने ओरडून म्हणाला.

''या सैनिकांना तुम्ही ओळखता. ते पळून जाणार नाहीत. एकतर ते आपल्याला ठार मारतील. किंवा आपण त्यांना मारु. एवढ्यावर हे संपणार नाही. रोमन सैन्याची गणतीही होऊ शकणार नाही. हे मेले तर नवे येतील.''

मुक्त झालेले गुलाम त्याच्याकडे बघतच राहिले. मग तो पुढचे वाक्य बोलला. ''---- आणि गुलामांचीही कुणी गणती करू शकणार नाही.''

त्यांनी झपाट्याने तयारी सुरू केली. मृत प्रशिक्षकांच्या अंगावरून त्यांनी सुरे काढून घेतले. किचनमध्ये घुसून चाकू, काटे, वाटण्यासाठी वापरले जाणारे मुसळ, दंडुके, जे काही मिळेल ते हातात घेतले. महिलांचा गट मागे उभा राहिला आणि सगळे पुरूष गुलाम पुढे झाले. भोजनकक्षाची दारे सताड उघडून ते लढाईसाठी बाहेर पडले.

गुलामांनी सगळी तयारी लगबगीने केली होती. पण बाहेर उभ्या असलेल्या त्या दोन सैनिकांना शंका आली आणि थोडी फुरसतही मिळाली. त्यांनी आपापली हत्यारे सरसावली. आणि वनराईतील सैनिकांनाही जमा केले. चाळीस सैनिक, दोन अधिकारी, आणि डझन हत्यारबंद प्रशिक्षक असा ताफा सज्ज होता. त्यांच्याकडे कट्यारी, ढाल आणि भाले होते. चौपन्न सशस्त्र माणसे विरुद्ध दोनशे उघडे नागडे जवळ जवळ नि:शस्त्र योद्धे असा सामना होता. रोमन सैनिकांचा आत्मविश्वास दांडगा होता. जगात अजिंक्य असा त्यांचा बोलबाला होता. दहा दहाच्या रांगा करून भाले उंचावून धावतच त्यांनी चाल केली. त्यांच्या अधिकाऱ्यांचे आदेश उच्चरवात ऐकू येऊ लागले. रस्त्यातील घाण काढण्यासाठी एखादा झाडू जसा सरसावला जातो तसे ते सरसावले. त्यांच्या मजबूत बुटांच्या टाचा ओढ्याच्या पाण्यात पडताच एका मागोमाग एक तुषार हवेत उसळू लागले. रानटी वेली चुरगाळल्या गेल्या आणि परिसरातील उरलेले गुलाम हे अभूतपूर्व दृश्य बघण्यासाठी गटागटाने इथेतिथे जमले.

पण निदान त्या क्षणी अजिंक्य रोमन सत्ता गाफील होती आणि गुलामांचे प्रमुखपद स्पार्टाकुसकडे होते. नेतृत्वाची काही निश्चित व्याख्या नसते. खरेखुरे नेतृत्व दुर्मिळ असते. जेव्हा सत्ता आणि समृद्धीचे वलय नसते तेव्हाच नेत्याची कसोटी लागते. हुकूम काय कोणीही देऊ शकतो. पण इतरांनी तंतोतंत पालन करावे अशाप्रकारे हुकूम देणे हा एक वेगळाच सद्गुण असतो. आणि स्पार्टाकुसमध्ये तो होता. त्याने योद्ध्यांना विखरून राहण्याचा आदेश दिला. आणि ते विखुरले. सैनिकांभोवती एक मोठे विस्कळीत वर्तुळ करण्याचा हुकूम त्याने दिला आणि त्यांनी तसे वर्तुळ केले. त्याक्षणीच सैनिकांचा हालचाल मंदावली. त्यांच्या अधिकाऱ्यांच्या मनात संभ्रम निर्माण झाला. योद्ध्यांनी सुमार दीडशे यार्डांपर्यंत परिघाचे एक मोठे वर्तुळ केले. सैनिक मध्ये सापडले. त्यांच्या हातातील भाले जास्तीतजास्त तीसचाळीस यार्डांपर्यंत जाऊ शकत होते. शिवाय भाला एकदाच फेकता येतो. पुढे काय?

त्याच क्षणी अकस्मात स्पार्टाकुसला पुढचा डावपेच स्पष्ट दिसला.

''दगडधोंडे फेका त्यांच्यावर. आता आपल्यावतीने या मातीतले दगडही लढतील.''

दगडांचा एकच वर्षाव सुरू झाला. स्त्रियांनीही उत्साहाने दगड फेकले. घराघरातले गुलाम जमा झाले. शेतातले गुलाम आले. बागांमध्ये काम करणारे गुलाम आले. सैनिकांना बचाव करण्यासाठी ढालींशिवाय काहीच नव्हते. गुलामांनी वर्तुळ आवळत आणले. सैनिकांच्या एका तुकडीने वर्तुळाच्या एका भागावर हल्ला केला. भाले फेकून मारले. तो एका योद्ध्याला लागला पण इतरांनी त्या तुकडीवर हल्ला चढवला आणि साध्या हातांनी अनेक सैनिकांना ठार मारले. दगडांच्या वर्षावामुळे फारच थोडे सैनिक आपल्या पायांवर उभे राहू शकले. त्यांनीही एक वर्तुळ करून प्रतिकार सुरूच ठेवला. तो पर्यंत गुलाम त्यांच्यावर तुटून पडले होते. टोळधाड पडावी तसे झाले. दहा सैनिकांच्या एका तुकडीने वर्तुळ तोडून पळून जाण्याचा

प्रयत्न केला. त्यांना गुलामांनी ओढून वर्तुळात आणले आणि मिळेल तिथे ठोसे मारून ठार केले. प्रशिक्षकही सुटले नाहीत. त्यापैकी दोघांना गुलाम स्त्रियांनी दगडांनी ठेचून मारले. कवायत शाळेपासून कापुआकडे जाणाऱ्या रस्त्यापर्यंत धुमश्चक्री झाली. चौपनही सैनिक व प्रशिक्षक ठार झाले. त्याहून अधिक गुलामही ठार झाले. ही फक्त लढाईची सुरुवात होती.

सर्वांच्या मस्तकात विजयाची नशा चढली होती. ते सगळेच आता हमरस्त्यावर पोहोचले होते. दूरवर स्पार्ताकुसला कापुआ शहराच्या भिंती दिसत होत्या. ऐन दुपारच्या उन्हात एखाद्या सुवर्ण नगरीसारखे कापुआ शहर झळाळत होते. विजयाचा उन्माद चढूनही स्पार्ताकुसला दूरवरून लष्कराच्या ड्रमचा आवाज ऐकू आला. अर्थ उघड होता. कापुआमधील हजारो सैनिकांना सावध करण्यात येत होते. यापुढे कोणालाही विश्रांती मिळणार नव्हती. जणुकाही संपूर्ण जगात विस्फोट झाला होता. एका विध्वंसक व शक्तिशाली लाटेवर स्पार्ताकुस आरूढ झाला होता. त्याच्या भोवताली रक्ताचा सडा पडला होता आणि मृत्यूचे चक्रीवादळ घोंगावू लागले होते. स्पार्ताकुसने भोवताली पाहिले. लाल केसांचा गॉलवंशीय क्रिक्सुस मोठमोठ्याने हसत होता. गानिकुस आनंदाने वेडापिसा होऊन हातवारे करीत कुणाशी तरी बोलत होता. डेव्हिडच्या हातातील सुऱ्यावर ताजे रक्त होते. प्रथमच त्याचे डोळे जिवंत वाटत होते. विशालकाय आफ्रिकन संयम राखून शांत होते. त्यातील काही त्यांचे रणगीत गुणगुणत होते. त्याने व्हरिनियला जवळ घेतले. इतर योद्ध्यांनाही आपापल्या स्त्रियांना जवळ घेऊन त्यांच्यावर चुंबनाचा वर्षाव केला. घरगड्यांनी त्यांच्याबरोबर बातियातुसच्या वाईनच्या बाटल्या आणल्या होत्या. सगळे जण त्या वाईनचा आस्वाद घेऊ लागले. व्हरिनिया स्पार्ताकुसकडे पाहात होती. तिच्या डोळ्यात अश्रू होते आणि चेहऱ्यावर हसू होते. स्पार्ताकुस सावध झाला. यावेळी जर हत्यारबंद सैनिकांनी हल्ला केला तर इतिहासाने त्यांचे कंबरडे मोडले असते. आता मिळालेला विजय दारूच्या आहारी जाऊन वाया घालवणे ही घोडचूक ठरली असती. कापुआच्या शहराची दारे उघडून सैनिक निघाले असणार.

आता तो कमांडर होता. त्याने गानिकुसला हुकूम दिला, 'जा आणि सर्व मेलेल्या सैनिकांच्या अंगावरील शस्त्रे काढून आण.' नोर्डो नावाच्या आफ्रिकन योद्ध्यास त्याने बोलावून आणले आणि कवायत शाळेचे शस्त्रागार उघडता येईल का याचा अंदाज घ्यायला सांगितले. त्याचा सर्व सौम्यपणा आता निघून गेला होता. मुक्तीची एक तेजस्वी ज्वाला त्याच्या आत धगधगत होती. या ज्वालेने जणू याचा पूर्णत: कायापालट केला होता. आतापर्यंतचे सर्व आयुष्य जणू काही या क्षणासाठी थांबवलेले होते. शतकानुशतके जणू काही तो या क्षणाची प्रतीक्षा करीत होता. जगातल्या पहिल्या गुलामाला जेव्हा साखळदंडाने करकचून बांधण्यात आले, जेव्हा लाकूड तोडण्यासाठी आणि पाणी शेंदण्यासाठी पहिला चाबूक गुलामाच्या पाठीवर बसला तेव्हापासून जणूकाही तो या क्षणाच्या प्रतिक्षेत होता.

रोमन शस्त्रे कोण वापरू शकतील, कोणती शस्त्रे घेऊन कोण लढले, हे सारे विचारात घेऊन स्पार्ताकुसने योद्ध्या गुलामांच्या तुकड्या केल्या. स्त्रियांना त्यांनी सांगितले की त्यांनी आत थांबावे. त्यांना धोक्यात घालायचे नाही.

स्त्रियांच्या संतापाचे दर्शन त्याला नुकतेच घडले होते. त्यांचे रूद्र रूप पाहून तो अवाक झाला होता. नुकत्याच झालेल्या लढाईत स्त्रियांनी फार मोठा वाटा उचलला होता. चाकू सुऱ्यांची त्या मागणी करीत होत्या. शस्त्रे कमी असल्यामुळे त्यांच्या वाट्याला काहीच आले नाही. तेव्हा अंगावरील चिरगुटेही फाडून त्यांनी त्यात धोंडे बांधून ते सैनिकांवर फेकून मारले.

कवायत शाळेजवळच डोंगराच्या उतारावर मोठमोठे मळे होते. तिथे मजुरीला असलेले गुलाम बाहेरील आक्रित बघण्यासाठी दगडी कुंपणाजवळ जमले होते. स्पार्ताकुसच्या लक्षात आले की, ही आपलीच माणसे आहेत. त्याने डेव्हिडला बोलावून एक कानमंत्र दिला. डेव्हिडने धावतच जाऊन त्या मजुरांना मुक्तीचा संदेश दिला. मजुरांपैकी एक तृतियांश डेव्हिडच्या मागे आले आणि मुक्तिलढ्यात सामील झाले. आल्याबरोबर त्यांनी योद्ध्यांना सलाम केला आणि त्यांच्या हाताचे चुंबन घेतले. शेतमजुरांनी आपल्या हातातील कुदळ आणि फावडी उंचावून धरली. ती आता अवजारे राहिली नव्हती. त्यांची आपोआपच हत्यारे झाली होती. शत्रूवर हल्ला करण्यासाठी ही अवजारेच शस्त्रांसारखी वापरली जाणार होती.

शस्त्रागाराकडे गेलेले आफ्रिकन तोपर्यंत परतले होते. मुख्य शस्त्रागार फोडण्यासाठी आणखी अर्धा तास लागला असता म्हणून त्यांनी तो नाद सोडून दिला होता. त्याऐवजी त्यांनी बाहेरच पडलेला शस्त्रांचा एक पेटारा फोडून तीस त्रिधारी बर्च्या बाहेर काढल्या होत्या. स्पार्ताकुसने त्या धारदार बर्च्या त्यांच्या ताब्यात दिल्या. या नव्याकोऱ्या शस्त्रांची त्याने चुंबने घेतली आणि त्यांच्या गूढ मायबोलीत कसल्याशा आणाभाका घेतल्या.

वेळ फार कमी होता. कुठेतरी सुरक्षित स्थळी ताबडतोब स्थलांतर करणे आवश्यक होते. योद्ध्यांची शाळा किंवा कापुआ या दोन्ही ठिकाणांपासून जास्तीतजास्त दूर जाणे आवश्यक होते. 'माझ्या मागोमाग चला.' त्याने हुकूम सोडला. व्हरिनिया त्याच्या बाजूबाजूने चालत होती. 'मला कधीच मागे ठेवू नकोस.' ती कुजबुजली. 'मी लढाईत कुठल्याही पुरुषापेक्षा कमी ठरणार नाही.' सारेजण स्पार्ताकुसच्या मागेमागे निघाले. रस्ता ओलांडून शेतजमीन पार करून ते डोंगराच्या दिशेने निघाले थोडे अंतर पार करताच त्यांना कापुआच्या रस्त्यावरून चाल करून येत असलेले सैनिक दिसले. सैनिकांनीही त्यांना पाहिले. त्यांच्या अधिकाऱ्यांनी लगेच सैनिकांच्या तुकड्या करून वेगवेगळ्या दिशेने रवाना केल्या. दोनशे सैनिक होते. ते वेगवेगळ्या दिशांनी शेतात घुसले. बंडखोर गुलाम एकत्रित जमा होण्याआधीच विखुरलेल्या अवस्थेत शेतमळ्यांमध्ये त्यांचा खात्मा करायचा हा डाव होता. कापुआत सर्वत्र गुलामांच्या उठावाची बातमी पसरली होती. हा फुकटचा सामना बघायला हजारो नागरिकांचा लोंढा

कापुआच्या सीमेबाहेर सुसाटला होता. ही लढाई कदाचित एका तासात संपेल किंवा महिनाभरही लागेल असे अनेकांना वाटत होते. याआधीही गुलाम पळून जाण्याच्या घटना घडल्या होत्या. पळाल्यानंतर ते गुलाम काही काळ जंगलात दडून राहात. काही मिळेल ते खाऊन राहात आणि कधीतरी सैनिकांच्या तावडीत सापडत. चाल करून येणाऱ्या सैनिकांना पाहून स्पार्ताकुसच्या लक्षात आले की, पळून जायलाही आता ठिकाण राहिले नव्हते. जेव्हा जगापासून पळून जाता येत नाही तेव्हा जग बदलणे हाच एक उपाय असतो.

स्पार्ताकुस थांबला. इतर सारे जण थांबले. मोठ्याने ओरडून तो म्हणाला, 'आपण या सैनिकांशी लढाई करू. हल्ला परतवून लावू.'

स्पार्ताकुसच्या निर्णयाने सर्वांमध्ये एक वेगळीच शक्ती संचारली. गुलाम आता गुलाम राहिले नाहीत. त्यांचे जातिवंत योद्ध्यांमध्ये रुपांतर झाले. भाडोत्री योद्धे नव्हेत. तर स्वेच्छेने लढणारे. स्वत:च्या स्वातंत्र्यासाठी मृत्यूला सामोरे जाणारे . कसेही करून जिवंत राहावे हेच काही दिवसांपूर्वी ज्यांच्या आयुष्याचे एकमेव उद्दिष्ट होते, त्यांना आता मृत्यूची अजिबात भीती वाटेनाशी झाली होती. याचा परिणाम व्हायचा तोच झाला.

कापुआमधील सैनिकांच्या पलटणी आल्या. त्यांची संख्या बंडखोर गुलामांपेक्षा कितीतरी अधिक होती.. सैनिकांकडे भरपूर हत्यारे होती. पण गुलामांनी बाजी मारली. गुलाम लढू शकतील असे सैनिकांना मुळी वाटतच नव्हते आणि सैनिक लढतीलच याची गुलामांना खात्री होती. डोंगर उतारावर चहूबाजूंनी गुलामांनी सैनिकांवर उड्या घेतल्या. स्त्रियांनी त्यांच्यावर दगडधोंड्यांचा तुफानी वर्षाव केला. हा धक्का सैनिक पचवू शकले नाहीत. चपळ सशाच्या मागे धावणाऱ्यांची जशी भंबेरी उडते, तसे त्यांचे झाले. भाले सैरभैर फेकत त्यांनी हल्ला परतवण्याचा प्रयत्न केला आणि अखेर कापुआच्या दिशेने काढता पाय घेतला. बंडखोरांनी त्यांना चक्क पिटाळून लावले. अर्थात पहिली वेळ असल्याने गुलाम मोठ्या प्रमाणात मारले गेले. सैनिकांनी पुन्हा हल्ला चढवला. तोपर्यंत ठिकठिकाणचे हजारो गुलाम स्पार्ताकुसला येऊन मिळाले होते. दुसऱ्या लढाईत गुलामाची जीवित हानी फारशी झाली नाही. तरीही रोमन सैनिकांना पळ काढावा लागला.

प्रशासनाची सूत्रे हलू लागली. कापुआत गुलामांनी मोठा उठाव केल्याचा अहवाल घेऊन आपिया हमरस्त्यावरून एक विशेष दूत रोमच्या सिनेटकडे रवाना झाला होता. याचा अर्थ उघड होता. येत्या काही दिवसातच जगज्जेत्या रोमचा सम्राट आपले बलाढ्य लष्कर गुलामांचा चक्काचूर करण्यासाठी पाठविणार होता. सैनिकांचा समुद्र बंडखोरांना जेरबंद करण्यासाठी रवाना झाला की, सिनेटमध्ये बसून प्रशासक युद्धाची गंमत अनुभवणार होते.

स्पार्ताकुसच्या बाजूने आता बंडखोर गुलामांचा छोटासा समुद्रच उभा झाला होता. सैनिकांच्या छोट्या छोट्या पलटनींचा पराभव करीत त्यांची शस्त्रे गुलामांनी काढून घेतली.

वेळ आली तर रोमन सम्राटाशीही युद्ध करण्याची त्यांची आता मानसिक तयारी झाली होती.

हजारोंनी बंडाखोर एकत्र जमले होते. घरगड्यांनी येताना बकऱ्या, मेंढ्या, बैल, अन्नधान्य असे जे हाती लागेल ते आणले होते. संध्याकाळच्या वेळी चुलाणी लावली जात. रटरटत्या मांसाचा ऊग्र गंध हवेत पसरत असे. वर्षानुवर्षे रोट-कांजीवर गुजराण करावी लागलेले गुलाम त्या खमंग मांसावर तुटून पडत. अशाच एका संध्याकाळी स्पार्ताकुसने जाहीर केले, 'आता आपण एक जमात आहोत. तुम्हाला मान्य आहे ना?'

हजारोंनी माना हलवल्या. या जमातीत गुलाम नव्हते. सर्वांना समान वागणूक होती.

'आता आपण काय करायचे? कुठे जायचे?' क्रिक्सुसने विचारले. 'सगळीकडे मालक आणि गुलाम अशीच व्यवस्था आहे. ती कशी मोडायची?'

'आपल्याला कुठेही पळून जायचे नाही.' स्पार्ताकुस ठामपणे म्हणाला. 'आपण मळ्यामध्ये जाऊ. घराघरांतील गुलामांना मुक्त करू आणि जेव्हा जेव्हा सैनिक येतील, तेव्हा तेव्हा त्यांच्याशी लढाई करू. यापुढे जग रोमन रीतीरिवाजानुसार चालवायचे की आपल्या रीतींनुसार हे आता देवांनाच ठरवू द्या.'

'पण शस्त्रे कुठून आणायची?' एकाने विचारले.

'आपण रोमन सैनिकांचा पराभव करून शस्त्रे मिळवू या. वेळ आली तर स्वत:च तयार करू या. गुलामांचे रक्त आणि घाम वगळले तर रोममध्ये शिल्लक राहाते तरी काय? त्यांची शस्त्रे तुम्ही आम्हीच तयार करत होतो ना? आता आपण स्वत:साठी शस्त्रे तयार करू आणि रोमने आपल्याविरुद्ध युद्ध पुकारल्यास आपण रोमलाही नेस्तनाबूत करू. आपण असे जग निर्माण करू जिथे गुलाम कुणीही नसेल. कुणीही मालक नसेल.'

ते एक स्वप्न होते. सगळे आता स्वप्नाळू बनले होते. त्यांचे स्पार्ताकुसवर इतके प्रेम जडले होते की, त्याने हुकूम केला असता तर प्रत्यक्ष देवांविरुद्ध लढाई करायलासुद्धा ते तत्क्षणीच सज्ज झाले असते.

''यापुढे स्वत:चा अपमान करत जगणे नको. यापुढे रोमन जगतात तसे आपण जगायचे नाही. रोमन कायद्याचे पालन करायचे नाही. आपण आपले स्वतंत्र कायदे तयार करू.''

''आपले कायदे काय असतील?''

''जे जे आपण मिळवू ते आपणा सर्वांचे असेल. अंगावरील वस्त्रे आणि हातातील शस्त्रे या व्यतिरिक्त व्यक्तीच्या मालकीचे काहीही नसेल. जुन्या काळी माणसे अशीच जगायची. आपण सगळे मिळून स्वत:ला श्रीमंत मानू शकतो इतकी सामग्री सध्या आपल्यापाशी आहे. आणि एक - कायदे तुम्ही कराल, मी नव्हे.'' स्पार्ताकुस म्हणाला.

''जी पत्नी असेल तीच फक्त आपली स्त्री असेल. एकाहून अधिक बायका करायच्या नाहीत. स्त्री-पुरुषांना समान न्याय लागू असेल आणि जर एखादे युगुल शांतीने राहू शकत

नसेल तर त्यांना अलग होण्याचा अधिकार राहील.'' त्यांचे कायदे मोजकेच होते. त्याबाबत सर्वांची सहमती होती.

त्यांनी शस्त्रे उंचावली. समोरच एक भव्य महाल होता त्या दिशेने मोर्चा वळविला. त्या घरातील मालक मंडळी कधीच पळून गेली होती. फक्त गुलाम तेवढे शिल्लक राहिले होते. ते लगेच स्पार्ताकुसच्या पक्षात सामील झाले.

संध्याकाळी स्पार्ताकुस सर्वांबरोबर बसला असताना गानिकुस म्हणाला, ''आपण सगळ्या जगावर चाल करून जाऊ आणि ते बदलून टाकू.''

स्पार्ताकुसच्या बाजूला व्हरिनिया बसली होती. त्याची मान तिच्या खांद्यावर विसावली होती. त्याच्या तपकिरी दाट कुरळ्या केसांमधून तिची बोटे फिरत होती. तिला खूप शांत आणि समाधानी वाटत होते. पण त्याच्या हृदयात मात्र वणवा पेटला होता. गुलामगिरीत असताना आपण शांत आणि समाधानी होतो असे त्याला वाटू लागले. संध्याकाळ सरून इटालियन आकाशात तारे चमकू लागले होते. स्पार्ताकुसच्या मनामध्ये विचारांचे वादळ थैमान घालू लागले होते. वेड्यावाकड्या विचारांनी, भीती आणि शंकाकुशंकांनी त्याच्या मनात ठाण मांडले होते. रोमचा पाडाव करायचा या विचाराच्या भव्यतेनेच त्याला हसू आले. त्याच्या त्या स्मिताने व्हरिनिया आणखीनच खूष झाली. तिच्या ओठातून नकळत एक गाणे उमलून आले. शांत रात्रीच्या वेळी त्या गाण्याचे स्वर दूरपर्यंत पसरत गेले.

''रानामधला कुणी शिकारी । हरीण घेऊन येई ।<br>
पाहात राही विस्तवाकडे । रानगीत तो गाई ।<br>
पोरासंगे बोलत राही । पत्नीसंगे बोलत राही ।<br>
रानगीत गाई । तो रानगीत गाई...''।

त्या गाण्यातून तिच्या बालपणीच्या आठवणी जाग्या झाल्या. तिच्या मनात वर्षानुवर्षे सुप्तावस्थेत असलेली लोकधून चाळवली गेली.

''स्पार्ताकुस रोमचा पाडाव तुला करावाच लागेल. तुझ्या लोकांना लढवायला शिकवावे लागेल. रोम संस्कृती नामशेष करून बंधुतेची नवी शहरे उभारावी लागतील. जिथे कुंपणे नसतील, भिंती नसतील असे नवे जग निर्माण करावे लागेल.''

स्पार्ताकुसच्या आतून जणूकाही कुणी त्याच्याशी बोलत होते.

ठिकठिकाणी पेटवलेल्या शेकोट्यांभोवती बंडखोर पेंगत होते. काही जण मधूनच एकमेकांना स्पर्श करून आपापल्या अस्तित्वाची खात्री करून घेत होते. स्पार्ताकुसचे डोळे दूरवरच्या ताऱ्यांकडे लागले होते. ती रात्र अपूर्व प्रेमाची आणि असीम शांततेची रात्र होती. क्वचितच अशी रात्र भाग्यवंतांच्या वाट्याला येते. शेकोट्यांभोवती विखुरलेला हजारो बंडखोरांचा तो समूह जणूकाही कुणी एकच व्यक्ती होती. त्यांचे ऐक्य अभेद्य होते.

◆◆◆◆

## ५. स्पार्ताकुसचा प्रहार

विला सालारियामध्ये एका रात्रीसाठी एकत्र आलेल्या त्या सर्वांना स्पार्ताकुसने जणू झपाटून टाकले होते. कारण ते सगळी सोंगे आणू शकले तरी स्पार्ताकुसचे सोंग आणू शकत नव्हते. ते स्पार्ताकुस होऊ शकत नव्हते. त्या गूढ गुलामामध्ये हे सगळे सद्गुण कुठून आले हे कदाचित सिसेरोला कधीच कळणार नाही. पण ग्राकुसला ते कळत होते. घर व कुटुंब, शील व सद्गुण व जे जे शिव, उदात्त व उन्नत त्या सगळ्याचे समर्थन गुलाम करीत. त्याचा अंगिकार करीत. याचे कारण म्हणजे जे जे पवित्र व उदात्त होते ते ते सर्व त्यांच्या मालकांनी त्यांच्या आयुष्यातून हिरावून घेतले होते.

स्पार्ताकुस द्रष्टा होता. भविष्यात काय घडेल त्या विषयी त्याचा एक अंदाज होता. ग्राकुसलाही त्याचा स्वत:चा एक दृष्टिकोण होता. भविष्यात काय घडेल याचा जेव्हा ग्राकुस विचार करीत असे तेव्हा त्याचा भीतीने थरकाप उडत असे. एका मृतप्राय थंडपणाची शिरशिरी त्याच्या अंगावर उठत असे. आजही तसेच झाले. रोमन लोकांच्या भयावह भविष्याचा विचार मनात येऊन तो पांढराफट्ट पडला.

त्या सगळ्यांना स्पार्ताकुसचा तिरस्कार वाटायचा. ते सगळे घरच स्पार्ताकुसने भरून गेले होते. त्याचे रूप-रंग-आकार किंवा आचार-विचारांविषयी कुणालाच फारशी माहिती नव्हती. पण ते अख्खे घर त्याच्या अस्तित्वाने भरून गेले होते. अख्खे रोमही त्याच्या अस्तित्वाने भरून गेले. त्याला फक्त एकच अपवाद होता - ग्राकुस. कुणालाही खोटे वाटले असते. पण फक्त ग्राकुस या तिरस्कारापासून मुक्त होता.

स्मृतींची पाने चाळता चाळता स्मृतींना रूप रंग आणि आकार येऊ लागला. जणू काही सगळे आता येथे समोर घडते आहे असे ग्राकुसला वाटू लागले. त्याला आठवला सिनेटमधला कालखंड. तिथल्या बड्या मंडळींमध्ये, सरदार, दरकदारांमध्ये बसताना आणि वावरताना त्याला वाटणारा अभिमान आणि त्या अभिमानाचे वैय्यर्थ जाणवून स्वत:विषयी वाटणारा तिरस्कार. त्याला आठवला एक ऐतिहासिक प्रसंग.... कापुआहून बातमी घेऊन अतिवेगाने दौडत एक घोडेस्वार आला होता. बातमी फार भयानक होती. लेन्तुलुस बातियातुसच्या युद्ध प्रशिक्षण शाळेत गुलाम योद्ध्यांनी बंड पुकारले होते. हे बंड देशभर पसरत चालले होते. त्याला आठवले, या बातमीसरशी सिनेटच्या सदस्यांमध्ये भीतीची लाट पसरली होती. बदकांच्या प्रचंड थव्यामध्ये व्हावा तसा संमिश्र आवाजांचा कोलाहल सिनेटमध्ये पसरला होता. सगळेजण एकाचवेळी बोलू लागले होते. सगळे घाबरलेले होते. चित्र-विचित्र कल्पनाचित्रे रेखाटू लागले होते आणि हे सगळे का? तर मूठभर गुलाम योद्ध्यांनी त्यांच्या प्रशिक्षकांना ठार मारले होते!

त्या दिवशीच्या आणखीही काही घटना तो नजरेसमोर आणू लागला. एका अंतरावरून अलिप्तपणे स्वत:कडे पाहू लागला. आपल्या अजस्त्र अंगरख्यात आपला जाडजूड देह गुंडाळून तो एका खोलीत बसलेला होता. त्या खोलीला तो आपले कार्यालय म्हणायचा. दारावर कुणीतरी टकटक केली.

''कोण आहे?'' त्याने विचारले.

''काही माणसे भेटायला आली आहेत.'' गुलामाने उत्तर दिले.

''मला कुणालाही भेटायचे नाही.'' त्याने ओरडून सांगितले. पण त्याचे त्यालाच जाणवले की हा पोरकटपणा आहे.

''ते नगरपिते आणि सिनेटचे आदरणीय सदस्य आहेत.''

ते आत आले. चर्चा सुरू झाली. बोलता बोलता कास्पियुस म्हणाला - ''कापुआमधील हे बंड साधेसुधे नाही. यातून पुढे फार मोठा धोका संभवतो.''

''मला तसे वाटत नाही.'' ग्राकुस थंडपणे म्हणाला.

''गुलामांच्या बंडामुळे जे नुकसान झाले आहे ते पाहता...''

''या बंडाविषयी तुम्हांला काय माहिती आहे?'' ग्राकुसने प्रतिप्रश्न केला. ''किती गुलाम यात गुंतलेले आहेत? कोण आहेत ते? बंडानंतर ते कुठे गेले? तुम्हाला वाटणारी चिंता किती खरी आहे?''

कास्पियुसने क्रमाक्रमाने एकेका प्रश्नाचे उत्तर द्यायला सुरुवात केली. ''आम्ही सतत संपर्क ठेवून आहोत. सुरवातीला फक्त गुलाम योद्धे बंडात सहभागी झाले होते. पहिल्या बातमीनुसार फक्त सत्तरजण पळून गेल्याचे कळले. नंतर अजून एक अहवाल आला. यानुसार दोनशेहून अधिक गुलाम पळून गेले आहेत. त्यात थ्रासियन, गॉलवंशीय आणि बरेचसे कृष्णवर्णीय आफ्रिकन आहेत. त्यानंतर येत गेलेल्या बातम्यांमध्ये पळून गेलेल्यांची संख्या वाढत गेली. कदाचित भीतीपोटी गुलाम पळाले असावेत. लॅटिफन्डिया परिसरात त्यांनी बरीच नासधूस केलेली दिसते. पण त्याचा तपशील उपलब्ध नाही. हे गुलाम वेसूवियस डोंगराच्या दिशेने कूच करीत असल्याचे कळते.''

''तुम्ही फक्त कळते, समजतेची भाषा बोलत आहात.'' ग्रेशियस अधीरपणे गुरकावला. ''कापुआत सगळे मूर्ख लोक भरलेले अहेत का? त्यांच्या भागात जे काही घडले त्याचा अर्थ त्यांना लावता येत नाही का? त्यांच्याकडे सैनिकांच्या तुकड्या आहेत. त्यांनी या सैनिकांचा वापर करून हे बंड ताबडतोब मोडून काढले नाही?''

कास्पियुस थंडपणे उत्तरला, ''पण कापुआमध्ये फक्त पाचशे सैनिक होते.''

''पाचशे! डझनभर गुलाम योद्ध्यांचे बंड मोडून काढण्यासाठी पाचशे सैनिक पुरेसे नाहीत काय?''

''कापुआत काय घडले हे जसे मला माहीत आहे तसेच तुम्हालाही माहीत....''

''मला माहीत नाही. परंतु मी अंदाज बांधू शकतो. तिथल्या सैनिकांचा प्रमुख बरे-वाईट धंदे करणाऱ्या स्थानिक लोकांकडून पैसे उकळत असणार. वीच-पंचवीस सैनिक एकीकडे तर डझनभर दुसरीकडे मजा करत असणार. शेवटी शहरात किती सैनिक आयत्यावेळी उपलब्ध झाले?''

''अडीचशे. लपविण्यात काही अर्थ नाही ग्राकुस, या सैनिकांचा गुलाम-योद्ध्यांनी पराभव केला. काळजी लागून राहिली आहे ती या पराभवाची. आम्हाला असे वाटते की शहरातील सैनिक ताबडतोब त्यांच्या मदतीसाठी पाठवावे.''

''किती?''

''किमान तीन हजार. म्हणजे सहा तुकड्या ताबडतोब पाठवा.''

''लगेच सैनिक पाठवू नका.'' त्यांचे म्हणणे सतत खोडून काढायची त्याला सवयच जडली होती.. ते सर्व स्तंभित झाले. शहरातून सैनिक का पाठवायचे नाहीत. याचे स्पष्टीकरण त्यांना हवे होते.

''कारण शहरातील सैनिकांवर माझा विश्वास नाही. गुलामांना काही काळ मोकळे ठेवा. त्यांच्या त्यांच्यातच भांडणे लागू द्या. शहरातून सैनिकांच्या तुकड्या पाठवू नका.''

''मग कुणाला पाठवायचे?''

''बाहेरच्या देशात गेलेल्या आपल्या फौजांपैकी चार-पाच तुकड्या मागवा आणि घाई करू नका. बंड करणारे गुलाम आहेत. मूठभर गुलाम त्यांचा काही परिणाम होणार नाही. मात्र तुम्ही महत्त्व दिलेत तर ते मोठे होतील.''

युक्तिवाद सुरूच राहिला.

◆◆◆◆

सुरुवातीला सिनेटने असा निर्णय घेतला, की शहरात उपस्थित असलेल्या सैनिकांपैकी सहा तुकड्या म्हणजे तीन हजार सैनिक कापुआला त्वरित पाठवावे. या निर्णयाला ग्राकुसनी विरोध केला होता. त्यांना सरळ करण्यासाठी मुद्दामच सिनेट समितीचे सदस्य आपल्या निर्णयावर ठाम राहिले.

शहर लष्कराच्या प्रत्येक तुकडीत ५६० सैनिक होते. त्यांना अधिक चांगली शस्त्रास्त्रे दिली जात आणि त्यांच्यावर खर्चही अधिक केला जात असे. हे सैनिक शहरातच असत आणि आरामात राहात. या उलट बाहेरच्या गावांमध्ये ठेवण्यात येणाऱ्या सैनिकांना तुटपुंज्या आहारात दिवस काढावा लागे. रोज पायपीट करावी लागे. घाम गाळावा लागे आणि वैराण माळरानावर रस्ते आणि शहरे बांधावी लागत. जगातल्या कुठल्या कुठल्या टोकांना त्यांना पाठविले जाई आणि बऱ्याचदा मायदेशी येण्याची संधी त्यांना मिळत नसे. विदेशातल्या भूमीवरच त्यांची थडगी उभी राहात.

शहरी लष्कराचे सैनिक आरामात असत. उत्तम दारू, तरुण मुली आणि विविध प्रकारचे खेळ हेच जणू त्यांचे जीवन बनले होते. सामान्यातला सामान्य सैनिकसुद्धा राजकीयदृष्ट्या महत्त्वाचा घटक होता. त्यामुळे त्यांचे हात ओले करण्यात राजकीय पुढाऱ्यांमध्ये स्पर्धा असायची. त्यांना सुंदर गणवेश दिला जायचा. शहरी लष्कराच्या प्रमुखपदांवर खानदानी घराण्यातील तरुण असायचे. लष्करात राहून नावलौकिक मिळवायचा आणि हाकेच्या अंतरावर असलेली नाट्यगृहे, झुंजीचे आखाडे व आलीशान उपहारगृहात वेळ घालवायचा हीच त्यांची दैनंदिनी होती. मुलांच्या पालनपोषणाची जबाबदारी झटकण्यासाठी ते नवजात बालकांची हत्याही करत. त्यांची शस्त्रास्त्रे व चिलखत संपूर्ण इटलीमध्ये उत्कृष्ट होते. त्यांना प्रशिक्षण कमी दर्जाचे होते अशातलाही भाग नाही. रोज सकाळी कवायती व्हायच्या. पण वस्तुस्थिती अशी होती, की देश-विदेशात तैनात केलेल्या फौजा शहरी लष्करापेक्षा अधिक काटक होत्या. शहरातल्या उपाशी, बेकार तरुणांच्या जमावाला पिटाळून लावणे वेगळे, अरुंद गल्लीतल्या राजकीय निदर्शकांवर ताबा मिळवणे वेगळे आणि चिवट अशा स्पॅनियार्ड, गॉल, जर्मन, थ्रासियन किंवा ज्यू अथवा अफ्रिकन वंशाच्या गुलामांशी उघड्यावर हातघाईवर लढाई खेळणे वेगळे. हे खरे असले तरी सुरुवातीला मूठभर गुलामांनीच उठाव केला होता. शहर लष्कराच्या सहा तुकड्या म्हणजे साडेतीन हजार सैनिक. ही संख्याच एवढी मोठी होती की उठाव सहज चिरडून टाकता येईल असे सिनेट सदस्यांना वाटले.

दुसऱ्याच दिवशी हे सैन्य रवाना झाले. त्यांचा ताबा वारिनियुस ग्लाब्रुस या तरूण सिनेटरकडे देण्यात आला. ग्लाब्रुस अहंमन्य होता. तो अनघड होता. त्याचे एकमेव वैशिष्ट्य म्हणजे राजकीयदृष्ट्या तो विश्वासपात्र होता. पहाटे कवायतीसाठी शहर लष्करातील सैनिक जमा झाले. तरीही कवायतींना उशीरच झाला. कारण कुठल्या अधिकाऱ्याने कुठे उभे राहायचे यावरून भांडणाला तोंड फुटले. तो सगळा घोळ मिटेपर्यंत सूर्य आकाशात तळपू लागला होता. अखेर सैनिकांनी कूच केले.

ग्राकुसला ते सगळे नीट आठवत होते. तो स्वत: व इतर दोन सिनेटर्स या सैनिकांना निरोप देण्यासाठी गेले होते. त्या सहा तुकड्या बँडच्या तालावर लयबद्ध हालचाली करू लागल्या. ते दृश्य हृदयाला भरती आणणारे होते. एकीकडून तालबद्ध वाजणारा बँड, एका लयीत पुढे मागे होणारा सैनिकांच्या जोश, उन्हात चकाकणारी त्याच्या डोक्यावरील हेल्मेट व त्या सर्वांच्या पुढे उत्तम जातीच्या पांढऱ्या शुभ्र घोड्यावर आरूढ झालेला वारिनियुस. त्याच्या छातीवरचे पितळी कवच... ते सगळे दृश्य अविस्मरणीय असेच होते. जमलेल्या लोकांचे अभिवादन तो प्रसन्न चेहऱ्याने स्वीकारत होता. हात उंचावून त्यांना प्रतिसाद देत होता.

अशा रीतीने स्पार्ताकुसचे नाव अखेर सिनेटपर्यंत पोचले. ते नाव कधी कानावर आले तेही ग्राकुसला ठळकपणे आठवत होते. बहुधा रोममध्येही ते नाव पहिल्यांदाच मोठ्याने घेतले जात होते. वारिनियुसने कापुआहून रोमला तातडीच्या डाकेने पाठवलेल्या अहवालातही स्पार्ताकुसच्या नावाचा उल्लेख होता. वारिनियुसने पाठवलेला अहवाल फारसा आशादायक नव्हता. वस्तुस्थितीची नोंद करणे आणि स्वत:ची टिमकी वाजवणे हे दोन्ही हेतू साध्य करताना वारिनियुस द्विधा मन:स्थितीत होता हे त्याच्या अहवालावरून स्पष्ट दिसत होते. बंडाची पार्श्वभूमी सांगणारे बातियातुसचे एक निवेदन त्याने अहवालासोबत जोडले होते. त्यातून त्याने असा निष्कर्ष काढला होता की, स्पार्ताकुस हा थ्रासियन गुलाम योद्धा आणि क्रिक्सुस हा गॉलवंशीय गुलाम योद्धा या दोघांनी मिळून बंडाचे नेतृत्व केले असावे. परंतु या बंडामध्ये किती गुलाम योद्धे सहभागी झाले याचा अंदाज या अहवालावरून येत नव्हता. तीन वेगवेगळ्या मळ्यांमध्ये बंडखोरांनी जाळपोळ केल्याचे त्याने नमूद केले होते. या मळ्यामधील गुलाम आपल्या मालकाशी नि:शंक निष्ठा बाळगणारे होते. परंतु मरणाच्या भीतीपोटी ते बंडखोरांना सामील झाले असावेत असाही अंदाज त्याने वर्तविला होता. बंडखोरांशी सहकार्य करण्याचे ज्यांनी नाकारले त्यांना त्वरित कंठ:स्नान घालण्यात आले.

दोन मळेवाल्यांनी कापुआमध्ये आश्रय घेण्याचा प्रयत्न केला परंतु गुलामयोद्ध्यांनी त्यांना अडवले आणि त्यांची हत्या केली. त्यांच्या गुलामांना बंडात सामील होण्यास भाग पाडण्यात आले. त्याशिवाय कामचुकार आणि नाठाळ वृत्तीचे अनेक गुलाम आपआपल्या मालकांची घरे सोडून पळून आले होते. बंडखोरांना सामील होण्यात त्यांचा स्वार्थ होता. अशा रीतीने एकत्र जमलेल्या या बंडखोर गुलामांनी बरेच अत्याचार केले होते. वारिनियुसच्या अहवालात अशा अत्याचारांची एक यादीच जोडलेली होती. अहवालाच्या शेवटी त्याने म्हटले होते की, ताज्या माहितीनुसार बंडखोर गुलामांनी वेसुवियस पर्वताच्या खडकाळ उतारावर आपले मुख्यालय उभारले आहे. त्या परिसरावर ताबडतोब आक्रमण करून बंड मोडून काढण्याचा आणि सिनेटच्या आदेशाचे पालन करण्याचा मनोदय त्यांनी व्यक्त केला होता.

सिनेटने त्याचा अहवाल स्वीकृत केला. त्याचबरोबर असा एक ठरावही संमत केला की, आपआपल्या मालकांची घरे सोडून पळून आलेले जे ऐंशी गुलाम सरकारच्या ताब्यात आहेत त्यांना अत्यंत कठोर अशी शिक्षा देण्यात यावी. ही शिक्षा प्रतिकात्मक असावी, जेणेकरून शहरातील सर्व गुलामांना इशारा मिळावा. आणि कर्तव्यात कसूर केली तर किती कठोर शिक्षा भोगावी लागते याचा धडा त्यांना मिळावा. या ठरावानुसार त्याच दिवशी घोड्यांच्या शर्यती सुरू असताना मधल्या विश्रांतीच्या वेळेस ऐंशी गुलामांना क्रुसावर लटकविण्यात आले.

पुढील सहा दिवसात वारिनियुस किंवा शहर लष्कराकडून काहीच खबरबात आली नाही. सातव्या दिवशी एक छोटासा अहवाल आला. शहर लष्कराला गुलामांकडून पराभव पत्करावा लागला होता. तो अहवाल अगदी छोटा होता. अहवालाच्या पुष्ठ्यर्थ अन्य कुठलीही वस्तुस्थिती निर्देशित करण्यात आली नव्हती. त्या पुढील बातमीसाठी सिनेट आणि अख्खे शहर तणावग्रस्त मन:स्थितीत चोवीस तास प्रतीक्षेत होते. प्रत्येकाच्या ओठांवर गुलामांच्या बंडाचाच विषय होता. पण फारशी माहिती कुणालाच नव्हती. शहरात सर्वत्र भीतीचे वातावरण होते.

◆◆◆◆

रोमच्या संपूर्ण सिनेटची बैठक सुरू होती. दालनाचे सर्व दरवाजे आतून बंद करण्यात आले. बाहेर रोमन नागरिक गर्दी करू लागले होते. संसदेकडे येणारे सर्व रस्ते तुडुंब भरून गेले होते. रोमन सम्राटाने बंडखोर गुलामांना नामशेष करण्यासाठी पाठवलेल्या विशेष सैनिकांच्या तुकड्या परत आल्या नव्हत्या. त्यापैकी एकच सैनिक आला होता. आणि तोच आत सिनेटसमोर आपले निवेदन देत होता. लेन्तेलुस ग्राकुस सिनेटच्या बैठकीत अत्यंत गंभीर चेहऱ्याने बसले होते. ग्राकुस मुरलेले राजकारणी होते. सिनेटमध्ये कुठल्या प्रकारचे राजकारण चालते याची त्याला पूर्ण माहिती होती. तिथे बसलेले तरुण, मध्यमवयीन आणि ज्येष्ठ सदस्यांनीही सिनेटमध्ये कसा प्रवेश मिळवला, सदस्यत्व कसे विकत घेतले याची इत्यंभूत माहिती ग्राकुसला होती.

त्यामुळेच या अहंमन्य मंडळींना स्पार्ताकुसने दिलेल्या दणक्याचा आतून आनंदही होत होता. सिनेटसमोर आज एक सैनिक हजर झाला होता. सिनेटने मोठा गाजावाजा करून पाठविलेल्या सैनिकांची एक मोठी पलटन स्पार्ताकुसने नामशेष केली होती. त्या तुकडीतला हा एकमेव सैनिक बचावला होता. ग्राकुसने असे ठरवले होते की, या सैनिकाला खोदूनखोदून प्रश्न विचारायचे आणि स्पार्ताकुसला क:पदार्थ लेखणाऱ्या या मंडळींचा नक्षा उतरवायचा. सैनिकांच्या हातात एक हस्तीदंती राजदंड होता. ते रोमन साम्राज्याचे प्रतीक होते. लढाईवर जाताना त्या सैन्याचा जो प्रमुख असेल, त्याच्याकडे राजसत्तेचे ते प्रतीक सोपविले जायचे.

''तो राजदंड माझ्याकडे देऊन टाक.'' ग्राकुसनी त्याला आदेश दिला. रोमची प्रतिष्ठा, शक्ती आणि संस्कृतीचे ते प्रतिक काही दिवसांपूर्वीच वारिनियुस या लष्करी अधिकाऱ्याच्या हाती देऊन त्याला स्पार्ताकुसविरुद्धच्या मोहिमेवर पाठविण्यात आले होते आणि आता हा सैनिक ते परत घेऊन आला होता.

''कुठलाही संकोच न ठेवता सगळे सांग. हा राजदंड तुझ्याकडे कसा आला तेही सांग.''

सैनिक बोलू लागला. ''माझे नाव अरालस पोर्‌थु. शहरातून ज्या तीन रेजिमेंट्स गेल्या होत्या त्यातल्या तिसऱ्या तुकडीत मी होतो. आम्ही सगळे आमच्या प्रमुख अधिकाऱ्याच्या

नेतृत्वाखाली स्पार्ताकुसचा उठाव चिरडण्यासाठी गेलो होतो. प्रवास फारच त्रासदायक होता. हत्यारांचे वजन खूप होते. डोक्यावरील हेल्मेट तापलेली होती. त्यामुळे मस्तकातून उष्ण ज्वाला उठल्यासारख्या वाटत होत्या. शहरात आकर्षक वाटणारे पायातले बूट आडरस्त्यावर व शेतात कुचकामी ठरत होते. अशा वातावरणात मध्येच पाऊस पडला. आम्ही सगळे भिजून गेलो. पुन्हा कडक ऊन्ह पडले. अशा कंटाळवाण्या प्रवासात आम्हाला एका शेतात काम करीत असलेले चार गुलाम दिसले. तीन पुरूष व एक स्त्री. पहिली तुकडी तशीच चालत समोर गेली. दुसऱ्या तुकडीत काहीतरी गडबड झाली. रांग मोडून सैनिक शेतात घुसले. त्यांनी त्या बाईला पकडले. तिच्याबरोबर असलेल्या गुलामांनी तिचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला. सैनिकांनी भाले मारून त्यांना ठार केले आणि मग....''

''सैनिकांच्या त्या अघोरी वागण्याने अखेर त्या स्त्रीचा अंत झाला. त्या तशा मनोवस्थेतच आम्ही त्या रात्री त्याच परिसरात तंबू ठोकला. परंतु दुसऱ्या दोन तुकड्यांनी तंबूही उभारण्याची काळजी घेतली नाही. उघड्या माळावर सैनिक पहुडले. मूठभर गुलामांना काय घाबरायचे असा विचार या निष्काळजीपणामागे होता. रात्र झाली. आम्ही सगळे डोंगरपायथ्याशी होतो. सगळे मिळून तीन हजारावर सैनिक होते. थकलेले असल्यामुळे आम्हाला झोपेने कधी घेरले ते कळले नाही. मला अकस्मात कधीतरी जाग आली. सर्वत्र विव्हळण्याचा आवाज येत होता. सगळे वातावरण किंकाळ्यांनी भरून गेले. मी उठून बसलो. सर्वत्र रक्तामांसाचा चिखल झालेला मला अंधूक चंद्रप्रकाशात दिसला. त्या सर्व परिसरात गुलामांनी दाटी केली होती. अर्ध्याअधिक सैनिकांना त्यांनी झोपेतच मारले. ज्यांनी उठण्याचा प्रयत्न केला त्यांना त्यांनी जाग येता येताच कापून काढले. माझ्या तोंडातून आपोआप एक किंकाळी निसटली. कमरेची कट्यार काढून मी त्या परिसराच्या बाहेर धाव घेतली. प्रेते तुडवीत मी धावत सुटलो. त्या विस्तीर्ण माळाच्या एका टोकापर्यंत आलो आणि आपोआपच थांबलो. भाले हातात असलेल्या स्त्रियांनी त्या परिसराला वेढा घातलेला होता. त्या स्त्रिया आपण नेहमी पाहतो तशा नव्हत्या. भीतीदायक आणि हिंस्त्र होत्या. रात्रीच्या वाऱ्यावर त्यांचे केस उडत होते व त्यांच्या नजरेत पुरेपूर घृणा भरलेली होती. एक भाला माझ्या दंडात घुसला. मी उलट्या दिशेने पळत राहिलो. पळतापळताच मला भोवळ आली. मी खाली पडलो.''

''मला जाग आली तेव्हा माझ्या आसपास दोघे-तिघेजण उभे असल्याचे मला दिसले. त्यातील एकजण कृष्णवर्णीय होता. ते सगळे योद्धे असावेत. त्यांचा नेता थ्रासियन असावा असे त्याच्या मोडक्या-तोडक्या लॅटिनवरून मला वाटले. त्याचे नाक फुटलेले होते. काळ्याभोर तीक्ष्ण डोळ्यांनी पापण्या जराही न हलविता तो माझ्याकडे बघत होता. त्यांच्या बोलण्यावरून त्याचे नाव स्पार्ताकुस असल्याचेही माझ्या लक्षात आले. त्या सर्वांनी मिळून आमचा प्रमुख अधिकारी वारिनियुस ग्लाब्रुस याला ठार तर मारलेच होते शिवाय त्याच्या

अंगावरील सर्व कपडे आणि वस्तू काढून घेतल्या होत्या. त्यातच हा राजदंड होता. स्पार्ताकुस तो राजदंड घेऊन माझ्याकडे आला आणि म्हणाला, ''हे सैनिका, घाबरू नकोस. आम्ही तुला मारणार नाही. आता आमच्या दृष्टीने रोमच्या सिनेटचा दंड म्हणजे तूच आहेस. तेव्हा हा राजदंड घे व परत जा. मी तुला जीवदान देतो. त्या बदल्यात माझा दूत म्हणून तू जा.''

''सांग त्यांना, माझ्याविरुद्ध लढण्यासाठी त्यांनी पाठविलेल्या तीन हजारांहून अधिक सैनिकांना मी धूळ चारली आहे. प्रत्येक गोष्टीकडे ते एक वस्तू म्हणून बघतात. गुलामांना ते बोलणारी वस्तू म्हणतात. ही वस्तू काय बोलते आहे हेही त्यांना जाऊन सांग. त्यांना म्हणावे तुमची सडलेली सिनेट आणि या सडलेल्या रोमला जग आता कंटाळले आहे. आमचे रक्त पिऊन आणि हाडे पिळून तुम्ही निर्माण केलेली संपत्ती आणि वैभव जगाला आता नकोसे झाले आहे. तुम्हाला फक्त एकच गाणे माहीत आहे ते म्हणजे चाबकाचे गाणे. आम्हाला यापुढे हे गाणे ऐकायची इच्छा नाही. अगदी सुरुवातीला सगळी माणसे समान होती. गुण्या गोविंदाने राहायची. त्यांच्यापाशी जे काही होते ते सगळे आपसात वाटून घ्यायची. जा आणि सांग त्या रोमन सम्राटाला की तुम्ही माणसांच्या दोन जाती निर्माण केल्या. मालक आणि गुलाम. पण लक्षात घ्या आता आम्ही गुलाम तुमच्यापेक्षाही संख्येने अधिक आहोत. तुमच्यापेक्षा शक्तिमान आहोत. तुमच्यापेक्षा चांगलेदेखील आहोत. कारण माणसामध्ये जेवढा म्हणून चांगुलपणा असायला हवा तो सगळा आता आमच्यापाशी आहे. आम्ही आमच्या स्त्रियांचा आदर ठेवतो, त्यांच्या बाजूने उभे राहातो, लढाईत खांद्याला खांदा लावून झुंज देतो. पण तुम्ही? तुमच्या स्त्रियांचे तुम्ही वारांगनांमध्येच रुपांतर करता आणि आमच्या स्त्रियांचे तुम्ही पशुधनांमध्ये रुपांतर करता. तुम्ही माणसांचे श्वान करता आणि नंतर गंमत बघण्यासाठी तुम्ही त्यांना रिंगणात एकमेकांसमोर उभे ठेवून झुंज लावता. ती झुंज तुम्ही आरामात पाहात बसता. आम्ही एकमेकांच्या उरावर बसलो असताना रोमन स्त्रिया आनंदाने चित्कारत मांडीवरच्या श्वानांना खाऊ घालत असतात. किती हिंस्र आणि बीभत्स लोक आहात तुम्ही आणि आयुष्याचा अगदी ओंगळ चोथा करून टाकला आहे तुम्ही. माणसाच्या सगळ्या स्वप्नांची तुम्ही चेष्टा चालवली आहे. कष्ट व घामाची तुम्ही थट्टा चालवली आहे.''

''तुमचे नागरिक सरकारी भत्त्यावर जगतात आणि सर्कस पाहात नाही तर झुंजीच्या रिंगणात गंमत पाहात दिवस घालवतात. मानवी जीवनातले बहुमोल असे सारतत्त्व तुम्ही शोषून घेतले आहे. तुम्ही केवळ गंमत म्हणून माणसे मारता आणि रक्तपाताने स्वत:चे मनोरंजन करून घेता. छोट्याछोट्या मुलांना तुम्ही कोळशाच्या खाणींवर मजूर म्हणून पाठविता आणि काही महिन्यांतच ती मुले मरून जातात. तुम्ही तुमचे सर्वच वैभव जगाला नाडून मिळवले आहे. तुम्ही चोर आहात. सगळ्या जगाची लुबाडणूक करणारे. जा, जाऊन सिनेटला सांग, की यापुढे ही पिळवणूक चालणार नाही. संपले ते सारे खेळ, आता वस्तूचा आवाज

ऐका. पाठवा आमच्याविरुद्ध तुमचे लष्कर. जेवढ्या वेळा लष्कर येईल तेवढ्यावेळा आम्ही त्याचा नि:पात करू. या तुकडीला जसे आम्ही ठार मारले तशीच गत यापुढच्या प्रत्येक तुकडीची करू. त्यांचीच हत्यारे काढून घेऊन आम्ही हत्यारबंद होऊ. संपूर्ण जग यापुढे तुमच्या या वस्तूचाच आवाज ऐकत राहील.''

''जगातील सर्व गुलामांना आम्ही जागे करू. सांगू, की उठा, तुम्हाला बांधून ठेवणाऱ्या शृंखला तोडून टाका. इटलीत सर्वत्र आम्ही फिरू आणि जिथे जाऊ तिथे गुलाम आमच्या बरोबर येतील आणि एक दिवस रोमवरदेखील चाल करू. त्या दिवशी रोम अक्षय शहर राहाणार नाही. सांग तुझ्या सिनेटला जाऊन, की आम्ही येणार आहोत. आणि येण्याआधी नक्कीच कळवू. येताना रोमच्या उत्तुंग भिंती आम्ही उलथून पाडू. रोममध्ये आल्यावर आम्ही सिनेटच्या सभागृहापर्यंत धडक देऊ. आतमध्ये शिरू. बलाढ्य सदस्यांना खुर्च्यांतून ओढून काढू. त्यांची वस्त्रे ओरबाडून काढू आणि मग नग्नावस्थेत जसे एकेकाळी ते आमचा न्याय करायचे तसाच त्यांचाही न्याय केला जाईल. त्यांनी केलेल्या एकेका गुन्ह्याचा चोख हिशेब केला जाईल. त्यांना म्हणावे, आत्मपरीक्षणासाठी सज्ज राहा. आमची स्मृती तल्लख आहे. आमच्यावर काय काय अत्याचार झालेत ते सर्व आम्हाला चांगले आठवतात. त्या सगळ्याचा हिशेब त्यांना द्यावाच लागेल. अशा प्रकारे न्यायदान झाल्यानंतर आम्ही अधिक चांगली शहरे उभारू. स्वच्छ, सुंदर शहरे उभारू. पण या शहरांभोवती भिंती नसतील. तिथे माणसे सुखासमाधानाने राहातील. हा माझा संदेश आहे. त्यांना जाऊन सांग, म्हणावे, स्पार्ताकुस नावाच्या गुलामाचा हा निरोप आहे.''

सिनेटचे सदस्य दगडी चेहऱ्यांनी हा दीर्घ निरोप ऐकत होते. पण त्याला आता बराच काळ लोटला. सगळे विस्मरणात गेले. स्पार्ताकुसचे ते शब्दही कुणी कुठे लिहून ठेवले नाही. सिनेटने कामकाजातून ते वगळून टाकले. केवळ काही जणांच्या स्मरणात ते शिल्लक राहिले. ग्राकुसच्या मनात ते शिल्लक आहेत. जनरल क्रासुस हे समजून घेऊ शकतात. गुलामांचे बंड विस्मृतीत गाडून टाकण्याचा प्रयत्न म्हणजे रोम संस्कृती जिवंत ठेवण्याची धडपड हेही त्यांना कळू शकते. स्पार्ताकुसविरुद्ध ते स्वत: लढले होते. स्पार्ताकुस एक महान जनरल होता हे त्यांना मान्य करावेच लागले. तो मूर्ख नव्हता. इतके तेजस्वी शब्द मूर्खांच्या तोंडून निघूच शकत नाहीत. तो चिल्लरही नव्हता. एक चिल्लर माणूस सलग चार वर्षे रोमच्या सत्तेला प्रतिकार करू शकला नसता. संपूर्ण इटलीची त्याने स्मशानभूमी करून टाकली होती. लोक म्हणतात, स्पार्ताकुस मरण पावला, पण अजूनही तो बोलताचालता आहे सिनेटप्रमुख ग्राकुसच्या मनात, लष्करप्रमुख क्रासुसच्या स्मृतीत.

◆◆◆◆

# ६. चिरकाल लढाई, लढाई आणि लढाई

विला सालारियामध्ये ग्राकुस, क्रासुस, अन्तोनियुस, जुलिया, कायुस, हेलेना, क्लॉदिया या सर्वांच्या गप्पा रंगात आल्या होत्या. राजकारण आणि युद्धाच्या गोष्टी ऐकून ऐकून जुलिया कंटाळल्यासारखी झाली होती. पण कायुसने तिची समजूत घातली. मधून मधून सिसेरो तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगून कंटाळा घालवण्याचा प्रयत्न करत होताच. स्पार्ताकुस आणि रोमन साम्राज्य यांच्यात पाच मोठ्या लढाया झाल्याची माहिती त्याने एक रोमन नागरिक या नात्याने दिली. क्रासुसचे असे म्हणणे होते, की जे काही पाच विजय स्पार्ताकुसने नोंदवले ते त्याला पराभवाची चैन परवडत नव्हती म्हणून. पण तरीही स्पार्ताकुसचे मोठेपण त्याला मान्यच होते. तो त्याला हनिबालपेक्षा मोठा सेनानी मानत होता. हनिबालकडे घोडदळ होते. स्पार्ताकुसकडे ते नव्हते. तरीही स्पार्टाकने रोमच्या नाकी नऊ आणले. रोमन लष्कर एवढे शक्तिशाली होते की हनिबालसारख्या सेनापतीलाही एकाच धडक मोहिमेत ते नष्ट करू शकले असते. पण स्पार्ताकुसला नामशेष करायला त्यांना चार वर्षे लागली.

जनरल क्रासुसने बोलता बोलता एक गुपित सांगून टाकले. स्पार्ताकुसला जसे वाटत होते तसे झाले नाही. इटलीतील सगळे गुलाम त्याला सामील झाले नाहीत. फक्त कडवे होते तेवढे त्याला जाऊन मिळाले. चार वर्षात कधीही स्पार्ताकुसकडे पंचेचाळीस हजाराहून अधिक माणसे नव्हती. आणि शेवटची लढाई झाली तेव्हा सत्तर हजार रोमन सैनिक लढत होते. क्रासुसच्या मनात विचार आला. इटलीतील सगळे गुलाम स्पार्ताकुसबरोबर असते तर आता आम्ही सगळे असे गप्पा मारत बसू शकलो असतो का?

''मला कुणाविरुद्ध लढायचे आहे हे जाणून घ्यायचे होते. गुलामांच्या उठावाने संपूर्ण इटलीमध्ये घबराट पसरली होती. रोमच्या त्या अवस्थेची कुणालाही लाजच वाटली असती. मला जाणून घ्यायचे होते की, जगातील सर्वात बलाढ्य सेना या गुलामांना बघून का पळ काढते?''

त्यावेळी आम्ही सिझलपाईन गॉल या परिसरात तंबू ठोकला होता. आम्ही इतकी कडक सुरक्षा व्यवस्था ठेवली होती, की हल्ला करण्याआधी स्पार्ताकुसला दोनदा विचार करावा लागला असता. तिथे तळ ठोकून मी माहिती मिळवायला सुरुवात केली. माझ्यात कमी गुण असतील पण जे आहेत त्यांचा पुरेपूर वापर मी करून घेतो. त्यातला एक गुण म्हणजे कुठल्याही गोष्टीचा परिपूर्ण अभ्यास करणे. स्पार्ताकुसबरोबर प्रत्यक्ष लढाई करण्याआधी दोनशे लोकांशी मी बोललो. हजारभर पानांचे अहवाल चाळले. ज्या बातियातुसच्या कवायत शाळेत स्पार्ताकुस भाडोत्री योद्धा म्हणून काम करीत होता त्याच्याकडून मी भरपूर माहिती घेतली. स्पार्ताकुसविरुद्ध लढलेले सैनिक आणि अधिकारी यांच्याशीही मी बोललो. त्यापैकी एकाने

मला सांगितलेली गोष्ट मी तुम्हाला सांगणार आहे. तो काळ होता स्पार्ताकुस आणि रोमन लष्कर यांच्यातील दुसऱ्या युद्धाचा. पहिल्या युद्धात स्पार्ताकुसने तीन हजाराहून अधिक सैनिक असलेल्या रेजिमेंट्स नष्ट केल्या होत्या. त्यानंतर सिनेटने पब्लियुस नावाचा सेनाधिकारी स्पार्ताकुसविरुद्ध पाठवला होता. सुमारे सात हजार सैनिक त्याच्याबरोबर होते. स्पार्ताकुस त्यांकाळी वेसुवियस नावाच्या डोंगराळ भागात होता. पब्लियुस त्याच्या मागावर होता. त्याने एक खुळचटपणा केला. आपल्या सैनिकांच्या तीन तुकड्या केल्या आणि तीन दिशांनी स्पार्ताकुसच्या मागावर पाठविले. प्रत्येक तुकडीत दोन हजारांहून अधिक सैनिक होते. तीन वेगवेगळ्या चकमकींमध्ये स्पार्ताकुसने पाब्लियुसच्या सैन्याचा पूर्णत: नि:पात केला. त्या डोंगराळ भागात एखाद्या अरुंद खिंडीत त्यांना गाठून झुंडीच्या झुंडी तो कापून काढीत असे. मात्र एका चकमकीत घोडदळाची संपूर्ण तुकडी आणि पायदळाचे काही मोजके सैनिक बचावले. आठे-नउशे सैनिकांची तुकडी जंगलातून पळ काढताना वाट चुकली आणि नेमकी गुलामांची वस्ती असलेल्या एका तळापाशी येऊन पोचली. हा तळ म्हणजे एक प्रकारचे छोटेशे खेडेच होते. काही पराभूत सैनिक स्पार्ताकुसला मिळालेले असावेत. कारण या खेड्याचे बांधकाम अगदी रोमन लष्कराच्या धर्तीचे होते. त्या वस्तीत महिला व मुलेच जास्त होती. अशा ठिकाणी हे सैनिक जाऊन धडकले. गुलाम स्त्रिया आणि मुले बघून त्यांचे पित्त खवळले. पराभवामुळे पिसाळलेल्या अवस्थेत ते होते. रानातले ससे मारावे तसे त्यांनी लहान मुलांना भोसकून ठार केले. पहिल्या धुमश्चक्रीत त्यांनी काही स्त्रियांचीही हत्या केली. पण नंतर वस्तीतील इतर स्त्रिया बाहेर आल्या. त्यांच्या हातात तलवारी, सुरे आणि भाले होते. त्यांनी जोरदार प्रतिकार केला. या स्त्रियांचे नेतृत्व व्हरिनियाकडे होते. स्पार्ताकुसची व्हरिनिया. पिंगट केसांची, हिंस्त्र, सशक्त. पिसाळलेल्या सिंहिणीसारखी ती लढत होती. तासभर धुमश्चक्री उडाली. तेवढ्यात काही सशस्त्र गुलामही त्या ठिकाणी आले. गुलामांचा प्रतिकार प्रखर झाला. अंगावरचे सर्व कपडे फाटले, तरी व्हरिनिया नग्नावस्थेत हातात भाला घेऊन सैनिकांवर तुटून पडली. मूठभर घोडेस्वार वाचले. त्यांनी पळ काढला. नंतर त्यांनी आपल्या लेखी अहवालात हे नोंदून ठेवले.''

''पण व्हरिनिया मारली गेली नाही का?'' क्लॉदियाने विचारले.

''ती जर व्हरिनिया असेल तर नक्कीच मारली गेली नसणार. ती पुन्हा पुन्हा वेगवेगळ्या लढायांमध्ये सहभागी झालेली दिसली.''

''अजून जिवंत आहे का ती?''

''आहे का जिवंत?'' क्रासुसनी तेच शब्द पुन्हा उच्चारले.

ग्राकुस अकस्मात उठले नि दालनाच्या बाहेर निघून गेले. सर्वत्र चिडीचूप शांतता झाली. सिसेरोला काहीतरी शंका आली. तसे त्याने बोलूनही दाखवले. 'हा म्हातारा का अस्वस्थ आहे कुणास ठाऊक.''

''खेळ खलास झालेला आहे. स्पार्ताकुस मारला गेला. व्हरिनिया पुन्हा गुलाम झाली. रोममधील बाजारात पुन्हा गुलामांचा महापूर आला.'' बोलताबोलताच क्रासुसच्या आवाजाला एकप्रकारची धार चढली.

''आणि स्पार्टकसचे काय? त्याचा मृतदेह सापडला नाही असे म्हणतात. तो निसटला तर नाही ना?'' क्लॉदियाने पुन्हा छेडले.

''सत्तर हजार रोमन सैनिकांचा समुद्र जेव्हा चाळीस हजार गुलाम सेनेला भिडला तेव्हा एकच धुमश्चक्री उडाली. स्पार्ताकुस आणि मी हाकेच्या अंतरावर आलो होता. खरा शूर सैनिक होता तो. त्याने मला हाळीही दिली. माझ्या दिशेने तो सुसाटत येताना मला दिसला. पण माझ्यापर्यंत पोहोचला नाही. त्याचे तुकडे तुकडे झाले. पण मी एक गोष्ट पाहिली, त्याच्या शरीराची पेशीन्पेशी लढत होती. खरा लढवय्या.''

◆◆◆◆

ग्राकुस पक्का मुरलेला राजकारणी होता. रोमच्या राजनीतीचा अर्क त्याच्यात भरलेला होता. त्यादिवशी त्याने फ्लावियुस मार्कुसला जेवायला बोलावले होते. मार्कुस सेक्सतुसकडे कामाला होता. सेक्सतुस आणि क्रासुस यांच्यातील दुश्मनी प्रसिद्ध होती. कावेबाज ग्राकुसने मुद्दामच मार्कुसला जेवायला बोलावले होते. मार्कुसकडे गावातल्या सगळ्या स्त्रियांची माहिती असायची. बाजारपेठेतल्या सगळ्या गुलाम स्त्रियांचीही वैशिष्ट्ये त्याला ठाऊक असायची. ग्राकुसला सध्या 'एका विशिष्ट' गुलाम स्त्रीची आवश्यकता होती.

दोघांनीही ग्लासात ब्रँडी ओतून घेतली. एक दोन ग्लास झाल्यावर ग्राकुसने विषय काढला. ''तू तुझे तोंड बंद ठेवणार असशील तर माझ्यासाठी एक काम करायचे आहे. मला हवी तशी एक गुलाम स्त्री तू शोधून दे. वाट्टेल तेवढे पैसे मी देईन.''

''त्यात काय मोठेसे?'' मार्कुस म्हणाला. ''गुलामांचा उठाव मोडून काढल्यानंतर बाजारात स्त्री-पुरुष गुलामांचा पूर लोटला आहे. तुम्हाला कशाप्रकारची बाई पाहिजे आहे? काळी, गोरी, पिवळ्या, तपकिरी वर्णाची, तरुण, प्रौढ, कुमारी, अनुभवी, सुंदर, कुरूप, पिंगट केसांची, आखूड केसांची? काय हवंय तुम्हाला?'' मार्कुसवर मद्याचा अंमल चढला होता.

''मला एक विशिष्ट स्त्री हवी आहे.'' ग्राकुस स्पष्ट शब्दात म्हणाले.

''ती स्त्री गुलाम आहे का?''

''होय, तिचे नाव आहे व्हरिनिया आणि ती स्पार्ताकुसची बायको आहे.''

''ओ, हो!'' मार्कुस सावध झाला आणि शोधक नजरेने ग्राकुसकडे बघू लागला. ''ती आहे तरी कुठे'' त्याने हळूवारपणे विचारले.

''मला ठाऊक नाही.'' ग्राकुस म्हणाले.

''तुम्ही तिला ओळखता तरी का?''

''म्हटले तर ओळखतो, म्हटले तर नाही.''

''निदान तिचे वर्णन तरी करू शकाल का?''

''हो, ती चांगली उंच आहे. सुदृढ असली तरी शिडशिडीत आहे. भरदार देहाची आहे. जर्मन वंशातील असल्यामुळे तिचे केस गवताच्या रंगाचे आहेत. डोळे निळे आहेत. गेल्या दोन महिन्यात तिने एका मुलाला जन्म दिला आहे. पण ते मूल जिवंत असेलच असे नाही.''

''काय वय असेल तिचे?''

''कमीत कमी तेवीस. जास्तीत जास्त सत्तावीसपर्यंत. पण मला खात्री नाही.''

''तिला शोधून काढायला मला तुम्ही किती दिवसांचा अवधी द्याल?''

''तीन आठवडे''

''आणि पैसे?''

''जी किंमत सांगितली जाईल ती मिळेल.''

◆◆◆◆

काही दिवसांनी मार्कुस पुन्हा ग्राकुसच्या घरी आला. काम फत्ते झाल्याची घोषणा त्याने आल्या आल्याच करून टाकली.

''कुठे आहे ती?'' ग्राकुसने विचारले.

''ती सापडली, पण मी तिला विकत घेऊ शकलो नाही.''

''काय?'' ग्राकुस जोरात ओरडले.

''मी तिला विकत घेऊ शकलो नाही. कारण ती आता विक्रीसाठी ठेवलेली वस्तू नाही.''

''पण मी वाट्टेल तेवढे पैसे द्यायला तयार आहे.''

''पैशाचा प्रश्नच नाही. तिच्या कपाळावर किमतीचे लेबल चिकटवलेले नाही. रोमन लष्कराचे प्रमुख जनरल क्रासुस यांच्या ती ताब्यात आहे. आणि त्यांच्याच घरी राहाते.''

''क्रासुसने तिला का विकत घेतले आणि घरी ठेवून घेतले. याची काही माहिती काढली की नाही?''

मार्कुस गालातल्या गालात हसला.

''काढली ना, क्रासुस म्हणे तिच्या प्रेमात पडले आहेत.''

''मार्कुस काहीही कर, मला ती हवी आहे.''

◆◆◆◆

दुसऱ्या दिवशी दुपारी ग्राकुस शहरातील सगळ्या स्नानगृहातून हिंडू लागले. ही मोठमोठी स्नानगृहे एक प्रकारचे राजकीय आणि सामाजिक अड्डेच होते. बडे-बडे लोक तिथे भेटायचे. बोलता बोलता लाखो करोडोंचे व्यवहार होऊन जायचे. सिनेटचे सदस्य, न्यायाधीश, बडे व्यापारी, यांच्या अनौपचारिक भेटीगाठींचे ते ठिकाण होते. ग्राकुस यांची अटकळ होती की

जनरल क्रासुस आपल्याला इथे कुठेतरी भेटणार आणि तसेच झाले. एका आलीशान स्नानगृहात जनरल क्रासुस आणि सिनेटर ग्राकुस यांची भेट झाली. ग्राकुसने सरळ मुद्द्याला हात घातला.

''जनरल, एरवी आपण एकमेकांवर गुरकावतो हे खरे असले तरी आपण मित्र होऊ शकतो नाही का?''

''मुद्द्याचे बोला'', क्रासुसनी थंडपणे फर्मावले.

''ठीक आहे, मी सरळच सांगून टाकतो. मला तुमच्याकडून एक गुलाम विकत पाहिजे.''

''हां, तुम्हाला स्वयंपाकी हवा असेल. तुमच्या डोक्यावर केस असते तर मी माझा हेअर ड्रेसरही तुम्हाला दिला असता. की तुम्हाला डोलीवाले पाहिजेत? बहुधा एखादी बाई हवी असेल. पण मी असे ऐकले आहे, की तुमच्या घरातल्या बहुतेक गुलाम स्त्रियाच आहेत.''

''जनरल, मला काय हवय ते तुम्हाला माहीत आहे. मला व्हरिनिया हवी आहे.''

''प्रिय ग्राकुस, तुम्ही खेळी खेळत आहात. ही सगळी माहिती तुम्हाला कोण पुरवते?''

''जनरल क्रासुस, मी गंभीरपणे बोलतो आहे. व्हरिनियासाठी मी दहा लाख सेस्तेर्सेस द्यायला तयार आहे. त्या किमतीची सोन्याची नाणी सुद्धा मी देईन आणि तीही ताबडतोब. जनरल, मला व्हरिनिया हवी आहे.''

क्रासुसनी हातांची घडी घातली. एक हळूवार शीळ त्यांच्या ओठातून निसटली.

''याला म्हणतात बोली. दहा लाख अशा सौद्यावर एखाद्याने कविता लिहिली असती. खर तर एक हजार सेस्तेर्सेसमध्ये बाजारात तरुण आणि सुंदर गुलाम मिळू शकत असताना तुम्ही एका किडकिडीत जर्मन मुलीसाठी दहा लाख द्यायला तयार आहात, हे विशेष आहे. राजकारणात एवढा पैसा मिळतो हे मला माहीत नव्हते. पण इतकी मोठी रक्कम मी कशी काय स्वीकारणार? लोक काय म्हणतील?''

''क्रासुस माझ्याशी खेळू नका.''

''मी कुठे खेळतोय, सिनेटर ग्राकुस. तुम्हीच माझ्याशी खेळ चालवलेला आहे. तुम्ही खरेदी करू शकाल असे काहीही माझ्याकडे नाही.''

''मी गंभीरपणे बोलतोय, चला वीस लाख सेस्तेर्सेस.''

''राजकारणात फारच पैसा दिसतोय.'' एवढे बोलून जनरल स्नानासाठी निघून गेले. ग्राकुस त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात राहिले.

◆◆◆◆

''व्हरिनिया, व्हरिनिया, तू आता पोषाख चढवला पाहिजेस. तुला उत्तमोत्तम पोषाखात तयार करण्याची जबाबदारी मालकांनी आमच्यावर टाकली आहे. आता थोड्याच वेळात ते येतील. तुला त्यांच्याबरोबर बसून भोजन करायचे आहे. तू आम्हाला इतका त्रास का देतेस?''

''मला तुम्हाला त्रास द्यायचा नाहीय.''

''पण तो होतोच बघ ना व्हरिनिया. तू म्हणत असतेस, की तूही एक गुलाम आहेस. त्यामुळे चार चार गुलाम स्त्रिया भोवती रेंगाळलेल्या तुला आवडत नाहीत. तू किती दुर्दैवी आहेस हेही तू सांगत असतेस. गुलाम असणे म्हणजे काय ते तुला ठाऊक आहे. पण काही काळ तू स्पार्टाकुसबरोबर होतीस. त्या जगज्जेत्या बरोबर असताना तूही राणीच होतीस. त्यामुळे गुलाम असण्याचे दु:ख तू विसरलीस की काय व्हरिनिया?''

''नका, असं बोलू नका. मी स्वत:ला तुमच्यापासून कधी वेगळे मानले आहे का?''

''तू मानत नसशील. पण मालक तुला आमच्यापेक्षा वेगळी मानतात. त्यांना कंटाळा आला की, आम्ही त्यांच्या शयनमंचावर असतो. दोघी, तिघी कितीही जणी. पण ते निव्वळ मनोरंजन असते. तुझ्यावर त्यांचे प्रेम आहे. त्यांना हवे तसे आम्ही तुला सजवले नाही, तर आमच्या पाठीत चाबकाचे फटके पडतात. तुला ते मारत नाहीत.''

''ठीक आहे, ठीक आहे. सध्या मी बाळाला पाजते आहे. बाळ झोपलं, की मी स्वत:ला तुमच्या स्वाधीन करीन. मग तुम्हाला हवे तसे मला सजवा.''

जनरल क्रासुस भोजनासाठी आले तेव्हा नेहमीप्रमाणे त्यांनी तक्रार केलीच. 'प्रिये, तू तुझे सुंदर शरीर त्या शालीआड का लपवतेस? तुला कल्पना आहे का, जो पोषाख तू अंगावर चढवला आहेस त्याची किंमत दहा हजार सेस्तेर्सेस आहे. मला तो पोषाख डोळे भरून बघण्याचा तरी आनंद मिळू दे.'' व्हरिनियाने आज्ञाधारकपणे शाल अंगावरून काढून टाकली.

''आज तू छान दिसते आहेस. उत्तम प्रसाधन, उत्तम पोषाख... व्हरिनिया हे असं किती काळ चालायचं. मी तुझ्याशी फार चांगला वागतो आहे होय ना? दु:ख हे शेवटी दु:ख असते. पण कधीतरी ते विसरायला लागते. मिठाच्या खाणीतील जीवनाची कल्पना करून बघ. मी तुझं मूल तुझ्यापासून हिरावून घेऊ शकतो. त्याला बाजारात तीनशे सेस्तेर्सेसला विकू शकतो आणि तुला खाणीवर पाठवू शकतो. चालेल तुला?''

''असं काही मला आवडणार नाही.''

''मलाही अशा भाषेत बोलायचा वीट आलेला आहे.'

''ठीक आहे. तुम्ही तुम्हाला हवं तर तसं बोलू शकता. मी तुमच्याच मालकीची आहे.''

''व्हरिनिया मला तुझा केवळ मालकीहक्क नकोय. खरे तर तूच संपूर्णपणे माझ्यावर ताबा मिळवलेला आहेस. मला तू माझी स्त्री म्हणून हवी आहेस.''

''मी तुम्हाला थांबवू शकत नाही. या घरातील कुठलीही स्त्री तुम्हाला थांबवू शकत नाही.''

''व्हरिनिया, मला तुझ्याबरोबर जबरदस्ती करायची नाही. गुलाम स्त्रियांचा मी जसा भोग घेतो तसा मला तुझा भोग नको आहे. तू जर माझ्यावर प्रेम केलेस तर माझ्यातून

काहीतरी नवीन आणि सुंदर असे आकार घेईल असे मला वाटते. तुला कल्पना आहे का जगातील सर्वात श्रीमंत माणूस म्हणून मी ओळखला जातो. तुझी साथ लाभली तर आपण नक्कीच अख्ख्या जगावर राज्य करू शकू.''

''मला जगावर राज्य करायचं नाही.'' बऱ्याच वेळाने व्हरिनियाच्या तोंडून एक वाक्य आले. तिचा स्वर निर्जीव होता आणि आवाज मृतप्राय होता.

''ते जाऊ दे व्हरिनिया. एक गंमत तुला सांगायची राहिली. आज स्नानगृहात रोमचा सर्वशक्तिमान सिनेटर ग्राकुस मला भेटला. त्याला कुठून कळले कुणास ठाऊक. तो तुझी चौकशी करीत होता. तुला विकत घेण्याची त्याची इच्छा आहे. त्याने खूप मोठी रक्कम देऊ केली होती. मी बधत नाही हे पाहिल्यावर त्याने त्या अवाढव्य रकमेतही दुपटीने वाढ केली. पण मी त्याचा अपमान करून त्याला हाकलून दिले.''

''तुम्ही मला विकून का टाकले नाही?'' व्हरिनियाने विचारले.

''त्या जाड्याच्या ताब्यात तुला देऊ? तू त्याला बघितले आहेस का? मांसाचा गोळा आहे तो.''

''मला काय फरक पडतो?''

क्रासुसने तिरीमिरीतच आपले ताट दूर लोटले आणि तो तिच्याकडे चकित होऊन बघतच राहिला. हातातला वाईनचा ग्लास त्याने एका दमात रिकामा केला. दुसरा भरला. अकस्मात त्याला रागाचा एक झटका आला. त्याने तो ग्लास दूर भिरकावून दिला. काही क्षणातच तो सावरला आणि संयमाने बोलू लागला.

''तू माझा इतका तिरस्कार का करतेस?''

''मी तुझ्यावर प्रेम का करावे क्रासुस?''

''करायला हवे. स्पार्ताकुसपेक्षा बरेच काही मी तुला दिले आहे.''

''मुळीच नाही.'' ती ठामपणे म्हणाली.

''असे कसे? कोण होता तो? असा कोणता देव लागून गेला होता तो?''

''स्पार्ताकुस देव नव्हता. तो एक साधा, सर्वसामान्य माणूस होता. गुलाम होता. याचा अर्थ तुम्हाला कळत नाही का? तुमचे अख्खे आयुष्य तर गुलामांमध्येच गेले.''

''मी तुला इथून बाहेर काढून एखाद्या गावात नेले आणि एखाद्या शेतकऱ्याच्या ताब्यात दिले तर तू त्याच्याबरोबर राहू शकशील? त्याच्यावर प्रेम करू शकशील?''

''मी फक्त स्पार्ताकुसवर प्रेम करू शकते. इतर कुठल्याही पुरुषावर मी कधीच प्रेम केले नाही. यापुढेही करणार नाही. पण एखाद्या शेतमजुराबरोबर मी नक्कीच राहू शकेन. तो थोडासा का होईना स्पार्ताकुससारखाच असेल. स्पार्ताकुस माझ्यापेक्षा निरागस होता. तुमच्याशी तुलना केली तर तो लहान मुलासारखा होता. त्याचे मन शुद्ध होते.''

''शुद्ध? तुला नेमके काय म्हणायचे आहे?'' स्वत:वर संयम ठेवत क्रासुसने विचारले. ''मी तुझ्या तोंडून बऱ्याचवेळा ही बकबक ऐकली आहे. स्पार्ताकुसने कायदा पायदळी तुडवला. तो समाजाचा शत्रू होता. व्यावसायिक खाटिक हाता. रोमने निर्माण केलेल्या सर्व सुंदर, नेटक्या आणि चांगल्या गोष्टींचा तो शत्रू होता. रोमने शांतता आणि संस्कृती निर्माण केली. या तुझ्या घाणेरड्या स्पार्ताकुसला जाळपोळ आणि विध्वंस यापेक्षा दुसरे काय माहीत होते? गुलामांना संस्कृती म्हणजे काय ते माहीत नव्हते आणि कळतही नव्हते. म्हणून त्यांनी शेकडो घरे पाडून टाकावीत? वास्तूशास्त्राचे अनेक नमुने नष्ट करावेत? चार वर्षात काय मिळवले त्यांनी? केला का रोमचा पाडाव? गुलामांच्या या उठावामुळे किती हजार माणसे मारली गेली माहीत आहे का तुला? किती यातना, किती दैन्य... कारण काय, तर त्या हरामखोराला स्वातंत्र्याचे स्वप्न पडले. स्वातंत्र्य... विध्वंसाचे''

व्हरिनिया गप्प बसून राहिली. तिची मान खाली होती. नजर जमिनीला लागलेली.

''तू मला उत्तर का देत नाही आहेस? स्पार्ताकुस शुद्ध होता याचा अर्थ काय?''

''माझ्यापुरते म्हणाल तर तो शुद्धच होता. तो एकही वाईट गोष्ट करू शकत नव्हता आणि एक सांगू? जगाला आग लावली ती आम्ही नव्हे. आम्हाला फक्त आमचे स्वातंत्र्य हवे होते. आम्हाला फक्त शांती हवी होती. आम्हाला काय हवे ते मला माहीत होते. आम्हाला मुक्त व्हायचे होते. काही माणसे गुलाम असवीत आणि इतर काही मुक्त असावीत हेच मुळी आम्हाला पटत नाही. तुम्ही म्हणता, की आम्ही फक्त विध्वंस केला. पण आम्ही एक गोष्ट निर्माणही केली, आशा!''

''व्हरिनिया तू एखाद्या लहान मुलीसारखी बोलते आहेस. म्हणे आम्ही आशा निर्माण केली. कुणासाठी? आणि कुठे आहे ती आशा आज? त्या आशेची राखरांगोळी झाली आहे. तुला कळते आहे का? जगात नेहमीच एकाच प्रकारची व्यवस्था कार्यरत राहील. बलवान नेहमीच दुर्बळांवर राज्य करतील. व्हरिनिया, तू एक गुलाम आहेस. तरीही माझे तुझ्यावर प्रेम आहे. मला जरा नीट सांग स्पार्ताकुस शुद्ध होता म्हणजे काय?''

''कसे समजावून सांगू तुम्हाला? गुलामांमध्ये स्त्री आणि पुरुष समान असतात. दोघेही एका प्रकारचे काम करतात. दोघांनाही चाबकाचे फटके खावे लागतात. आम्ही एकाच प्रकारे मरतो. मेल्यानंतर निनावी थडग्यात जाऊन पडतो. बंडाच्या सुरुवातीला आम्ही भाले आणि तलवारी घेऊन आमच्या पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून लढलो. स्पार्ताकुस माझा साथी होता. आम्ही एक होतो.

त्याच्याविषयी किती नि काय काय सांगू तुम्हाला? तुम्ही लोकांनी त्याला अक्राळविक्राळ स्वरूप दिले. पण तो साधा होता. सज्जन, चांगला आणि प्रेममय. त्याचे सहकाऱ्यांवर प्रेम होते. ते एकमेकांना मिठ्या मारीत आणि एकमेकांचे मुके घेत. तुम्ही रोमन पुरूष एकमेकांना

अशा प्रेमाने मिठ्या मारताना मी कधी पाहिले नाही. तरी तुम्ही लोक निर्लज्जपणे पुरुषांबरोबरही झोपता. शय्येसाठी तुम्हाला स्त्री किंवा पुरुष कुणीही चालते. गुलाम जेव्हा आपापसात भांडायचे तेव्हा स्पार्ताकुस त्यांना एकत्र बोलवायचा आणि ते यायचे. त्याचे ऐकायचे. त्यांचे काही चुकले तरी स्वत:मध्ये सुधारणा घडवून आणायची त्याची इच्छा असायची. ते कधीच एकटे नव्हते. एकमेकांचा अंश त्यांच्यात असायचा. सुरुवातीला ते चोऱ्या करायचे. स्पार्ताकुस मला सांगायचा, की त्यांनी असेच जीवन बघितले आहे. स्पार्ताकुस म्हणायचा - 'घाबरलेली माणसे वाईट वागतात.' त्याने त्यांच्या मनातून भीती काढून टाकली. भूक आणि दारिद्र्य यांची भीती त्याने नष्ट केली. सगळ्या वस्तूंची भांडारे तो उघडी ठेवू लागला. ज्याला जे हवे ते त्याने घ्यावे. कड्या-कुलुपांची गरजच त्याने नष्ट करून टाकली. त्यामुळे आपोआपच चोऱ्या थांबल्या. सगळी माणसे भावाभावांसारखी राहिली आणि असलेले सगळे त्यांनी आपापसात वाटून घेतले तर वातावरण किती शांत आणि समाधानी राहाते, माणसे किती प्रसन्न आणि सुंदर बनतात हे त्याने मला दाखवून दिले. असे जीवन मी प्रत्यक्ष जगले आहे. गुलाम म्हणजे काही खुनी आणि खाटिक नव्हते. जगाने अशी माणसेच याआधी पाहिली नव्हती. माणूस कसा असावा त्याचा नमुना आम्ही निर्माण केला. त्यामुळेच तुम्ही मला इजा करू शकत नाही. त्यामुळेच मी तुमच्यावर प्रेम करू शकत नाही.''

''चालती हो. माझ्या नजरेसमोरून दूर हो. देव तुझा नायनाट करो.'' क्रासुस ओरडले.

◆◆◆◆

ग्राकुसनी पुन्हा एकदा मार्कुसला बोलावून घेतले. मार्कुस लगबगीने आला. ते दोघे समोरासमोर बसून राहिले. एकमेकांची ओळख पटल्यासारखी एकमेकांकडे बघत राहिले. मार्कुसचे दु:ख ग्राकुसला माहीत होते. त्याने यशस्वी होण्याचा सतत प्रयत्न केला आणि त्याच्या पदरात मात्र नेहमीच अपयश आले. अनेक यशस्वी लोकांची नक्कल त्याने केली पण शेवटी अनुकरणाचा डाग तेवढा राहिला. मार्कुसही ग्राकुसला जाणून होता. जुना ग्राकुस काळाच्या पडद्याआड गेला होता. हा एक वेगळाच ग्राकुस तो बघत होता. एका गुलाम स्त्रीच्या प्रेमात पडलेला. त्यासाठी वीस लाख सेस्तेर्सेस पणाला लावणारा.

''पण मला समजत नाही ही प्रेमाची काय भानगड आहे? तुम्ही कधीच लग्न केलेले नाही. गुलाम स्त्रियांचा भोग तेवढा घेतलात. प्रेयसीने मायेने आपली बोटे तुमच्या अंगावरून फिरवली आहेत असे कधी तुमच्या आयुष्यात घडले नाही आणि आता तुम्ही म्हणता, की व्हरिनियावर माझे प्रेम आहे. तिच्यासाठी वीस लाख सेस्तेर्सेस उधळायची माझी तयारी आहे. मला काही कळत नाही.''

''तुला ते कळण्याची आवश्यकता काय आहे? तुला वीस लाखांशी मतलब. काहीही कर. ती स्त्री मला हवी आहे.''

''आता मी तुमच्यासमोर वस्तुस्थिती ठेवतो. जनरल क्रासुस आज बाहेरगावी चालले आहेत. त्यांच्या नोकरांना पैसे चारून व्हरिनियाला पळवून आणता येईल. ती यावी म्हणून तिलाही काहीतरी द्यावे लागेल. गुलामाला काय हवे असणार? स्वातंत्र्य. तिला जर तुम्ही रोमच्या बाहेर पोहचविण्याचे वचन दिलेत तर ती येईल. दुसरे म्हणजे क्रासुस आल्यानंतर त्यांना जेव्हा हे कळेल तेव्हा ते संतापाने पेटून उठतील. कदाचित तुमचा जीवही घेतील.''

''क्रासुसचे ठीक आहे. ते मी पाहून घेईन. व्हरिनियाला मुक्त करण्याची माझी तयारी आहे. ते तू तिला नीट पटवून दे. सगळी व्यवस्था मी करतो. तिला रोमच्या बाहेर सोडण्याची जबाबदारीही तुलाच घ्यावी लागेल. मी तुला घोड्याची बग्गी देईन आणि वाटेत कुणी अडवू नये म्हणून पत्रही देईन. चल कामाला लाग. त्या तिथे पेटीत रोख रक्कम ठेवलेली आहे. तुझ्या दोन-पाच पिढ्या तेवढ्या पैशावर आरामात जगू शकतील.

◆◆◆◆

दुसऱ्या दिवशी मार्कुसने वेगवान हालचाली केल्या. क्रासुस गावाला गेलेले होते. ती संधी त्याने साधली. संध्याकाळची वेळ होती. ग्राकुस एकटेच जेवण उरकण्याच्या तयारीत होते. तेवढ्यात एक गुलाम आला. त्याने वर्दी दिली. दोन माणसे भेटायला आली आहेत. मार्कुस आणि एक महिला. त्या स्त्रीच्या कडेवर बाळ आहे. ग्राकुस लगबगीने स्वत:च उठले. बाहेर गेले. त्यांनी त्या दोघांचे जातीने स्वागत केले. अतिमहत्त्वाच्या पाहुण्यांना घरात घेताना जे मार्दव प्रकटते तेच त्यांच्या संपूर्ण चेहऱ्यावर झळाळत होते.

त्या स्त्रीच्या अंगावर एक सैलसर पायघोळ झगा होता. प्रवेशद्वारपाशी फारसा उजेड नसल्याने तिचा चेहरा पटकन दिसू शकला नाही. तिच्या हातात मूल होतं. ग्राकुस अतिशय दक्ष होते. तिला वाईट वाटेल अथवा तिचा अपेक्षाभंग होईल असा एकही वावगा शब्द आपल्या तोंडून बाहेर पडू नये यासाठी काळजीपूर्वक बोलायचे असे त्यांनी ठरवले होते.

''बाळाची काळजी करू नका. आपल्या घरात पाळणा आहे आणि देखरेखीची सर्व व्यवस्थाही आहे. बाळ आरामात राहील. त्याला काहीही कमी पडणार नाही.''

''मला फारसे काही लागत नाही.'' व्हरिनियाने पहिले वाक्य उच्चारले. ग्राकुस तिच्या आवाजात गुंतून पडले. सौम्य आणि मृदू असा तिचा स्वर होता. त्यात गहिरेपणा होता. एक वेगळीच प्रसन्नता, व्यक्तिमत्वाची एक वेगळीच समृद्धी जाणवत होती. तेवढ्यात तिने आपल्या अंगरख्याचे मस्तकावरील आवरण दूर केले. प्रथमच तिचा चेहरा त्याला दिसला. कसलीही रंगरंगोटी तिने केलेली नव्हती. किंबहुना त्यामुळेच तिच्या चेहऱ्यावरील चढउतार नेमकेपणाने जाणवत होते. बघत राहावे इतकी ती देखणी होती. लांबसडक पिवळे केस मागे घेऊन तिने ते मानेजवळ बांधले होते. ग्राकुस तिच्याकडे पाहातच राहिले आणि त्याचवेळी मार्कुस त्यांच्याकडे पाहात होता.

''बरंय, ग्राकुस मी निघतो. मला पुढची सगळी व्यवस्था करायची आहे. घोड्यांची बग्गी घेऊन मी पहाटेच्या सुमारास येईन. तुम्ही तयार राहा.''

मार्कुस निघून गेला. ग्राकुसनी व्हरिनियाला एका खास खोलीत आणले. तिथे एक पाळणा होता. एक गुलाम स्त्री बसलेली होती. तिच्याकडे बोट दाखवून ग्राकुस म्हणाले, ''ही रात्रभर इथे बसून राहील. बाळावरून जराही नजर हटवणार नाही. बाळ रडले तर लगेच तुला वर्दी देईल. बाळ इथे आरामात झोपी जाईल.''

''हो, बाळ नक्कीच मजेत झोपी जाईल. तुम्ही फार दयाळू आहात.''

''तुला भूक लागली आहे का? तू काही खाल्लं आहेस का?''

''मी काही खाल्लेलं नाही. पण मला भूकही नाही.'' बाळाला पाळण्यात ठेवता ठेवता व्हरिनिया म्हणाली, ''मला इतका आनंद झालेला आहे, की मला भूकही जाणवत नाहीय. मला स्वप्नात असल्यासारखे वाटतंय. तुमच्या त्या माणसावर किती विश्वास ठेवावा हे मला कळत नव्हते. पण आता माझी खात्री झाली आहे, की तो खरे बोलत होता. तुम्ही माझ्यासाठी इतके का करावे मला कळत नाहीय. मी मुक्त होणार आहे यावर माझा विश्वासच बसत नाहीय. मला वाटतंय, की स्वप्नात आहे आणि कुठल्याही क्षणी झोपमोड होऊन मी जागी होईन. त्यावेळी हे काहीही तिथे नसेल.''

''तुला काही खायचं नसलं तरी माझ्याबरोबर बसायला हरकत नाही. वाटलंच तर काही तरी हलकंफुलकं खाता येईल.''

''ठीक आहे, आपण बसू.''

ती दोघेच भोजन कक्षात आली. ग्राकुस काही वेळ अवघडल्यासारखे बसून राहिले. व्हरिनियाच्या चेहऱ्यावरून आपली नजर दूर करणे त्यांना अशक्य झाले होते. आयुष्यात पहिल्यांदाच असा अनुभव त्यांना येत होता. संपूर्ण समाधान वाटत होते. जगात सगळे आलबेल चालले आहे, असे वाटत होते. जगातील सर्व ठणकणारी दु:खे एका क्षणात अदृश्य झाल्यासारखे त्यांना वाटले. समोर बसलेल्या स्त्रीबद्दल प्रेमाचा एक नितळ झरा त्यांच्या मनात झुळझुळू लागला. आपल्या संपूर्ण अस्तित्वात प्रेमाचा उद्‌भव झाल्याचे त्यांना जाणवले. पण हे का आणि कसे घडले त्याचे विश्लेषण त्यांना त्या क्षणी करायचे नव्हते. एक वेगळाच अनुभव त्यांना येत राहिला आणि ते स्वत:ला त्यात विरघळू देत राहिले.

''व्हरिनिया तुला माहीत आहे का? जनरल क्रासुस फार मोठे असामी आहेत. इजिप्तच्या फारोआपेक्षा अधिक शक्तिशाली. तू आग्रह धरला असतास तर त्याने तुझ्याशी लग्नही केले असते आणि तू इजिप्तच्या राणीपेक्षाही मोठी झाली असतीस. त्यामुळे तुला थोडेतरी सुख मिळाले असते की नाही?''

''सुख? ज्याने स्पार्टाकुसला ठार मारले, त्याच्याकडून सुख?''

''विचार कर, त्याने काही स्वत: स्पार्टाकुसला मारले नाही. तो स्पार्टाकुसला ओळखतही नव्हता. त्यांच्यात काही वैयक्तिक वैमनस्य नव्हते. तसे बघायचे झाले तर मीही तेवढाच अपराधी आहे. स्पार्टाकुसला नष्ट केले ते रोमने. पण आता स्पार्टाकुस जिवंत नाहीय. तू मात्र जिवंत आहेस. जनरल क्रासुस तुला खूप काही देऊ शकतील. तुला ते नकोय का?''

''मला त्यांच्याकडून काहीच नकोय.''

''प्रिय व्हरिनिया, तुला हवे आहे तरी काय?''

''मला मुक्त व्हायचे आहे. रोमच्या बाहेर जायचे आहे. जिवंत असेपर्यंत पुन्हा कधीही या शहराचे तोंड मला पाहायचे नाही. माझा मुलगा स्वातंत्र्यात वाढायला हवा.''

'स्वातंत्र्याला एवढे महत्व असते का? कशासाठी स्वतंत्र व्हायचं? उपासमार भोगण्यासाठी? तलवारीने कापले जाण्यासाठी? घरदार नसताना काय उपयोग स्वातंत्र्यचा? स्वतंत्र व्हायचे आणि शेतात श्रम करायचे. शेतकऱ्यासारखे, हो ना?''

''मी तुम्हाला नीट समजावून सांगू शकणार नाही. क्रासुसनाही मी सांगण्याचा प्रयत्न केला पण मला ते जमले नाही. तुम्हालाही ते कसे सांगावे मला कळत नाही.''

''आणि तू रोमचा तिरस्कार करतेस. माझे तर रोमवर प्रेम आहे. व्हरिनिया, रोम हे माझे रक्त आहे. माझे जीवन आहे. रोम म्हणजे माझी आई. माझे वडील. मला माहीत आहे रोम ही एक रंडी आहे. पण मला हेही माहीत आहे, की रोम सोडले तर मी मरून जाईन. पण तू रोमचा दुस्वास करतेस. का? मला आश्चर्य वाटते आहे. स्पार्टाकुसही रोमचा तिरस्कार करत असे का?''

''स्पार्टाकुस रोमच्या विरुद्ध होता आणि रोम स्पार्टाकुसच्या विरुद्ध होते हे तुम्हालाही माहीत आहे.''

''पण रोमचा पाडाव करून त्याला दुसरे काय उभे करायचे होते?''

''त्याला असे जग उभे करायचे होते, जिथे कुणी गुलाम नसेल आणि कुणी मालक. भावाभावासारखी एकत्र राहाणारी माणसे आणि सर्वत्र शांतीचा वावर. तो म्हणायचा की, रोममध्ये जे सुंदर आणि चांगले आहे, ते आपण घेऊच. आपण अशी शहरे बांधू ज्यांना भिंती नसतील. आपल्या जगात युद्ध नसेल, दैन्य नसेल आणि यातनाही नसतील.''

''स्पार्टाकुसचे स्वप्न असे होते तर... चाबुक नसलेले जग निर्माण करायचे. ते कितपत शक्य आहे कुणास ठाऊक. असो. व्हरिनिया तुझ्या मुलाचे नाव तू काय ठेवले आहेस.?''

''स्पार्टाकुस! दुसरे काय नाव ठेवणार मी त्याला?''

''बरोबर आहे, स्पार्टाकुस हे नावच योग्य आहे. हळूहळू तो मोठा होईल. ऊंच आणि बलशाली आणि तू त्याला त्याच्या वडिलांविषयी सांगशील.''

''हो ना.''

''काय सांगशील त्याला तू? तो अशा जगात वाढेल, की जिथे भोवताली स्पार्ताकुससारखी माणसे नसतील. त्याचा बाप विशुद्ध आणि सज्जन होता हे तू त्याला कसे समजावून सांगणार?''

''तुम्हाला कसे कळले स्पार्ताकुस शुद्ध आणि सज्जन होता ते?''

''ते कळणं कठीण आहे का?''

''काही लोकांना ते कठीण असते. तुम्हाला सांगू, माझ्या मुलाला मी काय सांगेन ते? मी त्याला सांगेन स्पार्ताकुस वाईटाविरुद्ध लढला. आणि उभ्या आयुष्यात चुकीच्या गोष्टींना त्याने थारा दिला नाही. म्हणून तो शुद्ध होता.''

''चुकीचे काय आणि बरोबर काय ते स्पार्ताकुसला कसे कळत असे, व्हरिनिया?''

''त्याच्या लोकांसाठी जे चांगले ते बरोबर, त्यांना ज्यामुळे दु:ख होईल ते चूक.''

''स्वप्ने पाहाण्याइतका मी तरुण राहिलो नाही. व्हरिनिया. नाहीतर मीही स्वप्ने पाहिली असती. माणसाला एकच तर आयुष्य मिळते. ते इतके छोटे, निरर्थक आणि निरुद्देश असते. एका क्षणात ते संपूत जाते. हा आता इथे माणूस जन्माला येतो आणि हा हा म्हणता मरूनही जातो. आता हा मी इथे बसलो आहे. माझे वय झाले आहे. अंगावर चरबी साचली आहे. त्यामुळे मी विद्रुप वाटतो आहे. स्पार्ताकुस देखणा होता का, व्हरिनिया?''

व्हरिनियाच्या चेहऱ्यावर प्रथमच स्मिताची रेषा उमटली. हळूहळू ती हसायला लागली. तिचे हसणे एवढे वाढत गेले की, तिच्या डोळ्यात अश्रू तरळले. जेवणाच्या टेबलावर आपली हनुवटी टेकवून ती ढसाढसा रडू लागली.

''व्हरिनिया, शांत हो. माझे काही चुकले का?'' ग्राकुसनी हळूवार आवाजात विचारले.

व्हरिनिया सावरून बसली. एका छोट्या नॅपकीनने तिने आपला चेहरा पुसला. ''मला रडू आले ते तुमच्यामुळे नव्हे. तुमचे काही चुकले नाही. स्पा.ार्ताकुसवर माझे खूप प्रेम होते. तो तुम्हा रोमन लोकांसारखा नव्हता. तो माझ्या टोळीतल्या माणसांसारखाही नव्हता. तो थ्रासियन वंशाचा होता. रूंद आणि बसक्या चेहऱ्याचा. कंत्राटदाराने त्याला एकदा फटका दिला आणि त्याचे नाक फोडले. लोक म्हणायचे तो शेळीसारखा दिसतो. पण माझ्यापुरता तो जसा हवा तसाच होता.''

उभायतांमधले परकेपण आता गळून पडले होते. ग्राकुस तिच्या जवळ गेले. त्यांनी तिचा हात हातात घेतला. संपूर्ण आयुष्यात अशा प्रकारे ते कुठल्याही स्त्रीच्या जवळ गेले नव्हते. इतकी आश्वासक स्त्री त्यांना कधीही भेटली नव्हती.

''व्हरिनिया तुला माहीत आहे का? माझ्या मनात कोणकोणते विचार येऊन गेले ते? आधी मी असे ठरविले होते, की तुझ्याकडे प्रेमाची फक्त एक रात्र मागावी. नंतर मी स्वत:च तो विचार झिडकारून टाकला. असे ठरविले, की सन्मान आणि आदराने थबथबलेली एक

रात्र परस्परांसोबत घालवावी. नंतर तोही विचार मी बाजूला सारला. मिळतील तेवढे क्षण एकमेकांबरोबर कृतज्ञतेत घालवावेत अशा मनोवस्थेत मी आलो. पण व्हरिनिया कृतज्ञतेपेक्षाही उदात्त असे काहीतरी जगात असेलच ना?''

''हो ना, नक्कीच!'' ती प्रांजळपणे म्हणाली.

''दिवस उजाडेपर्यंतची वेळ आपल्या हाती आहे. आपण थोडावेळ बोलत बसू. थोडी वाईन घेऊ. काहीतरी हलकेसे खाऊ. तुला सांगण्यासारखे माझ्याकडे बरेच काही आहे. आणि तुझ्याकडूनही मला खूप काही ऐकायचे आहे. पहाटेपहाटे मार्कुस घोड्यांची बग्गी घेऊन येईल. त्यानंतर तू कायमची रोम सोडून जाशील ना? माझ्यासाठी एवढे करशील?''

''मलाही त्याची गरज आहे.''

''मी तुझे आभार मानणार नाही. तुझे आभार कसे मानावेत हेच मला कळत नाही.''

''आभार मानण्यासारखे यात काही नाही. मी पुन्हा सुख व आनंद या भावनांचा अनुभव घेऊ शकेन असे मला वाटले नव्हते. तुमच्यामुळे मी पुन्हा आनंदमय होऊ लागले आहे. स्पार्ताकुस गेल्यानंतर माझ्या चेहऱ्यावर पुन्हा हसू उमटेल असे मला वाटले नव्हते. यापुढे आयुष्य एखाद्या वाळवंटासारखे असेल असेच मला वाटले होते. स्पार्ताकुस मला नेहमी सांगायचा - आयुष्य ही सगळ्यात महत्त्वाची गोष्ट आहे. त्याला काय म्हणायचे होते ते मला आता कळते आहे. मला हसायचे आहे. असे का वाटते ते मला कळत नाही. पण मला खूपखूप हसायचे आहे.''

◆◆◆◆

मार्कुस परतला तेव्हा पहाट व्हायला अजूनही एक प्रहर शिल्लक होता. ही वेळ विचित्र असते. एकाकी, रंगहीन. यावेळी आयुष्य निःश्वास टाकत असते. गतीचे चक्र अगदी निम्नस्तरावर आलेले असते. तिथून ते नव्याने पुन्हा वेग घेणार असते. एक शब्दही न बोलता घरातल्या रक्षकाने मार्कुसला ग्राकुस आणि व्हरिनिया यांच्यापाशी नेले. ग्राकुस आपल्या खुर्चीत बसले होते. त्यांच्या चेहऱ्यावर थकवा जाणवत असला तरी ते आनंदी वाटत होते. व्हरिनिया बाजूच्या कोचावर बसून बाळाला पाजत होती. तीही थकल्यासारखी वाटत होती. पण तिचे सौंदर्य जसेच्या तसे होते. अवीट. मार्कुस स्तब्धपणे उभा राहिला. बाळाला पाजून झाल्यावर व्हरिनियाने त्याला उबदार दुलईत गुंडाळले. ग्राकुस उभे राहिले आणि तिच्याबाजूने वळले. काही क्षण ती त्यांच्याकडे एकटक पाहात राहिली.

''मी घोड्यांची बग्गी घेऊन आलो आहे.'' मार्कुसने सांगायला सुरुवात केली. ''त्यामुळे कमीत कमी वेळात दूरपर्यंत जाता येईल. आम्हाला ताबडतोब निघायला हवे.''

त्यांच्या कानावर त्याचे शब्द जणू काही पोहोचतच नव्हते. ती दोघे एकमेकांकडे बघत होती. त्या तंद्रीतून बाहेर आल्यावर व्हरिनियाने घरगड्याकडे पाहून म्हटले - एक मिनिटभर

बाळाला धरशील का? त्याने लगेच बाळाला आपल्या हाती घेतले. एका उत्कट ऊर्मीसरशी व्हरिनिया ग्राकुसजवळ गेली. तिने त्यांचे दंड कुरवाळले. त्यांच्या चेहऱ्यावरून आपले हात फिरवले. ते तिच्या दिशेने झुकले. तिने स्वत:हून त्यांचे चुंबन घेतले.

''व्हरिनिया, मार्कुस तुझी काळजी घेईल आणि मार्कुस आता तू एक श्रीमंत माणूस आहेस. आनंदात राहा, तिची आणि बाळाची काळजी घे. उत्तरेकडे जा आणि तिला आल्प्स पर्वताच्या पायथ्याशी सोड. तिथे गॉल वंशाचे शेतकरी राहातात. सरळ, साधे, मेहनती लोक आहेत ते. त्यांच्यात ती सहज सामावून जाईल.''

त्यांना सोडण्यासाठी ग्राकुस दारापर्यंत गेले. बाळाला उराशी घट्ट पकडून व्हरिनिया बग्गीत बसली. त्याच्याकडे पाहात तिने हात हलवला. बग्गी निघाली.

ग्राकुस आपल्या कार्यालयाकडे वळले. तिथल्या भव्य खुर्चीत काही काळ ते स्तब्ध बसून राहिले. त्यांनी आपले डोळे मिटून घेतले. त्यांना थकल्यासारखे वाटत होते. तरीही एका वेगळ्याच प्रकारच्या तृप्तीचा अनुभव आयुष्यात पहिल्यांदाच त्यांना आला होता. तृप्ती काही केल्या कमी होत नव्हती. त्यांनी आपले डोळे मिटून घेतले. त्यांची स्मृती सैरभैर झाली. लहानपणापासूनच्या अनेक गोष्टी त्यांना आठवू लागल्या. खूप जुना काळ... तेव्हा रोमन नागरिक श्रम करीत आणि मेहनतीला प्रतिष्ठा होती. त्यांचे वडील एक गरीब चांभार होते. खूप जुना काळ तो.... नंतर त्यांना आठवला आणखी एक कालखंड. तेव्हा राजकारणात नाव मिळवण्यासाठी ते धडपडत होते. रस्त्यावरची रक्तलांच्छित टोळी युद्धे... मतांची खरेदी विक्री... समूहाचा वापर करण्याची कला... सत्तेच्या शिडीवर एक एक पाऊल वर चढत जाणे. तरी पुरेशी सत्ता पुरेसा पैसा कधी हाती आला नाही. असा तो काळ. काही प्रामाणिक रोमन नागरिक गणराज्यासाठी भांडत होते. लोकांच्या हक्कासाठी रस्त्यावर येत होते. शेतकऱ्यांची नाडणूक आणि मळ्यांमध्ये होणारी गुलामांची पिळवणूक याविरुद्ध आवाज उठवीत होते. ग्राकुसना त्यांच्या लढ्याचा अर्थ कळत होता. पण ते व्यवहारीही होते. हा लढा कधीच यशस्वी होणार नाही हेही त्यांना कळत होते. इतिहासाचे चक्र उलटे फिरवता येत नाही हे लक्षात घेऊन त्यांनी सम्राटाबरोबर हातमिळवणी केली. न्याय आणि तत्त्वांच्या बाजूने लढणाऱ्यांची कत्तल केली. मग भरपूर पैसाही हाती आला. इतरांना दहशत वाटावी इतकी सत्ता हाती आली. या सगळ्या उलटसुलट विचारांचे थैमान त्यांच्या मनात सुरू होते. पश्चाताप किंवा कणव यांचा लवलेशतही मनात न येता ते विचार करीत होते. स्वत:ला समजून घेण्याचा प्रयत्न करीत होत. त्यांच्या पूर्वायुष्यातील त्यांचे शत्रू प्राचीन स्वातंत्र्यासाठी झुंजत होते. पण प्राचीन काळात तरी खऱ्या अर्थाने स्वातंत्र्य होते का? आज इथे त्यांच्या घरातून एक स्त्री निघून गेली. तिच्या उरात स्वातंत्र्य आगीसारखे धगधगत होते. तिने आपल्या मुलाचे नाव स्पार्टाकुस ठेवले होते. कदाचित तोही आपल्या मुलाचे नाव स्पार्टाकुस

ठेवेल. गुलाम कधीकाळी गुलाम राहाण्यात समाधान मानतील का? या प्रश्नाला उत्तर नव्हते. आपण काहीही पर्याय देऊ शकत नाही हे त्यांना जाणवत होते. तरीही त्यांना त्याचा पश्चाताप होत नव्हता. हे शहर तसेच राहाणार होते. कायम ते तसेच असणार. कधीकाळी नवा स्पार्ताकुस येईल. माणसांनी निर्भयपणे जगावे म्हणून या शहराभोवतीच्या भिंती पाडून टाकेल आणि त्या नव्या स्पार्ताकुसला नवा ग्राकुस दिसेल. या शहरावर प्रेम करणारा. शहराच्या सगळ्या विकृतींसकट हे शहर स्वीकारणारा नवा ग्राकुस प्रत्येक कालखंडात असणारच.

ग्राकुस स्पार्ताकुसच्या स्वप्नाविषयी विचार करू लागले. त्याचे स्वप्न साकार होईल का? व्हरिनिया म्हणाली ते खरे आहे का? वाईटाविरुद्ध झुंज दिल्याने माणसे खरेच विशुद्ध आणि स्वार्थविरहित होतात का? अशी माणसे त्याला माहीत नव्हती. पण स्पार्ताकुस तरी त्याला आधी कुठे माहीत होता? व्हरिनिया त्याच्या नुकतीच परिचयात आली होती. ती मात्र खरी होती. आता स्पार्ताकुसही हवेत विरून गेल्यासारखा झाला होता. व्हरिनिया निघून गेली होती. एक स्वप्न संपले होते.

त्यांच्या घराची देखभाल पाहाणारी गुलाम स्त्री त्यांच्यापाशी आली. ते म्हणाले, -''त्या टेबलावर काही पिशव्या आहेत. प्रत्येक पिशवीत मी गुलामांना मुक्त केल्याचे प्रमाणपत्र व प्रत्येकी वीस हजार सेस्तेर्सेस ठेवलेले आहेत. सर्वांना सांग त्या पिशव्या घेऊन निघून जा.

''तुम्हाला काय म्हणायचे आहे मला कळले नाही''-

''मला वाटते मी स्पष्टपणे बोलत आहे. आजपासून तुम्ही मुक्त आहात आणि तुम्हाला नीट जगता यावे म्हणून काही पैसेही मी ठेवले आहेत.''

''तुमची काळजी कोण घेईल? स्वयंपाक कोण करील?'' प्रौढ मोलकरणीने विचारले.

''कोणतेही प्रश्न विचारू नकोस. मी सांगतो तसे कर.''

गुलाम एक एक करून निघून जायला लागले. तो तासभराचा वेळही त्यांना सहन होईना. थोड्याच वेळात सगळे निघून गेले. घरात सर्वत्र विचित्र शांतता पसरली. नवी शांतता. सकाळचा सूर्य उगवत होता. समोरच्या रस्त्यात दैनंदिन जीवन नव्या उत्साहाने वेग घेत होते. पण ग्राकुस यांचे घर मात्र त्या गजबजाटापासून अलिप्त होते.

ग्राकुस उठले. एका खणापाशी जाऊन त्यांनी त्याचे कुलूप काढले. एक छोटी स्पॅनिश कट्यार काढली. अतिशय देखणी कट्यार होती ती. अनेक वर्षांपूर्वी कुठल्याशा समारंभात त्यांना भेट मिळालेली. खरे तर त्यांना हत्यारांची घृणा वाटायची. आपली बुद्धी हेच एकमेव आणि सर्वात विश्वासार्ह हत्यार आहे असे त्यांना वाटायचे. मात्र बुद्धीची त्यांना कधी घृणा वाटली नाही. आत्महत्येच्या विचाराने त्यांना हसू आले. ती कट्यार आपल्या शरीरात घुसवण्याचे धैर्य आपल्यापाशी आहे की नाही याची त्यांना शंका होती. कट्यारीची धार थोडीशी चरबीत घुसल्यावर आपण हातपाय गाळले तर? आपल्याच रक्ताच्या थारोळ्यात

पडून मदतीसाठी आरडाओरडा केला तर? एवढे राजकारण केले. टोळीयुद्धे केली. पण कधीच त्यांनी कशाचीच हत्या केली नव्हती. साधी एक कोंबडीही कधी मारली नव्हती. त्यांच्या लक्षात येऊ लागले... त्यांना मृत्यूची सतत भीतीच वाटत आली होती. लहानपणी ते देवादिकांच्या अद्भुत गोष्टींची खिल्ली उडवायचे. वयात आल्यानंतर त्यांच्या वयाच्या इतर सुशिक्षित तरुणांप्रमाणे देवबिव काही नसतो आणि मृत्यूनंतर जीवन नसते हा दृष्टिकोण त्यांनी सहजच स्वीकारला होता. आत्महत्या करण्याचा त्यांचा निर्धार या विचारांनी अधिकच दृढ झाला. अशाप्रकारे मृत्युला कवटाळल्यानंतर अप्रतिष्ठा होईल म्हणून ते घाबरत होते.

त्यांची तंद्री भंग पावली. कुणीतरी मोठमोठ्याने दार वाजवत होते.

किती हा संताप? क्रासुस किती खवळला आहेस तू. अपमानाने पेटून उठला आहेस. एका जाड्या बथ्थड म्हाताऱ्याने हात पुढे करावा आणि युद्धानंतर आपण मिळवलेली एक सर्वोत्कृष्ट चीज पळवून न्यावी, याचा किती हा अनावर संताप! पण क्रासुस तुझे तिच्यावर कधीच प्रेम नव्हते. तुला स्पार्ताकुसला क्रुसावर लटकवायचे होते आणि ते जमले नाही तेव्हा ती तुला हवीशी झाली. तिने तुझ्यावर प्रेम करावे, तुझ्यासमोर लोटांगण घालावे असेच तुला वाटत होते. महामूर्ख आहेस तू, क्रासुस! पण तुझ्यासारखी माणसेच एखादा अख्खा कालखंड आपल्या मुठीत घट्ट पकडण्यात यशस्वी ठरतात.

त्यांच्या हातातून कट्यार खाली पडली होती. गुडघ्यावर बसून ते ती शोधू लागले. कट्यार खुर्चीखाली पडलेली होती. त्यांनी ती हातात घेतली आणि सर्व शक्तीनिशी आपल्या छातीत खुपसली. प्राणांतिक वेदनांनी त्यांच्या तोडून एक किंकाळी निघून गेली. त्याच अवस्थेत ते जमिनीवर पडले. त्या धक्क्यानिशी कट्यार त्याच्या शरीरात पूर्ण घुसली.

जनरल क्रासुसनी दार फोडून आत प्रवेश केला तेव्हा ग्राकुस त्या अवस्थेत जमिनीवर पडलेले त्यांना दिसले. सर्वशक्तीनिशी त्यांनी त्यांचा देह उचलून सरळ केला. ग्राकुसने आत्महत्या केल्याचे त्यांच्या तत्क्षणीच लक्षात आले. त्यांच्या चेहऱ्यावर पिळवटलेली वेदना गोठल्यासारखी झाली होती. रागाने क्रासुस पिसाळल्यासारखे झाले होते. त्याच अवस्थेत ते आपल्या घरी परतले. आयुष्यात त्यांनी ग्राकुस इतका तिरस्कार कुणाचाही केला नव्हता आणि आता स्वतःच्या हाताने त्यांना ठार मारण्याची संधी होती तर म्हातारा आधीच जीव देऊन मोकळा झाला होता.

◆◆◆◆

ग्राकुस यांच्या आदेशानुसार मार्कुसने बग्गी रोमच्या बाहेर काढली. आधी उत्तरेकडे आणि नंतर पूर्वेकडे असा प्रवास त्यांनी केला. कास्सियाचा हमरस्ता चांगला होता. त्यामुळे दिवसभराचा प्रवास उत्तम झाला. संध्याकाळी थोडी विश्रांती घेऊन रात्रभर पुन्हा बग्गी धावली. दुसऱ्या दिवशीच्या पहाटे व्हरिनियाला खूप दूरच्या अंतरावर दरीतून वाहणारी एक

नदी दिसली. दुसऱ्या बाजूने डोंगरांच्या रांगा चढत गेलेल्या दिसल्या. आल्प्स पर्वत नजरेच्या टप्प्यात आला होता. ती दुपारपर्यंत प्रवास करावाच लागला. रस्ता आता अगदीच अरुंद झाला होता. एखादी चिंचोळी वाट असावी तसा आणि बग्गी पुढे जाणे शक्यच नव्हते. डोंगर उतारावर शेतकऱ्यांच्या झोपड्या दिसत होत्या. एका बाजूला छोट्या छोट्या घरांचे पुंजके दिसत होते. त्या ठिकाणी मार्कुसने बग्गी थांबवली.

''बरंय, व्हरिनिया. चलतो मी. इथून मैलभर अंतरावर शेतकऱ्यांचे गाव आहे. तू बग्गीतून आलीस हे दिसले तर त्यांना शंका येईल. म्हणून इथून तू चालतच जा. आणि हो. ही बॅग घे. यात एक हजार सेस्तेर्सेस आहेत. यातून तुला गरज वाटल्यास वर्षभर अन्नधान्य विकत घेता येईल. हे शेतकरी साधेभोळे आहेत. ते तुला समावून घेतील. कधी काळी तुला वाटलेच की हा पर्वत ओलांडून आपल्या गावी जावे तरी ते तुला मदत करतील.''

''मी तुझी आभारी आहे, फ्लावियुस.'' व्हरिनिया म्हणाली. मार्कुसची बग्गी उलट्या दिशेने वळून धावू लागली.

♦♦♦♦

**पुढे घडले ते असे** : मैलभर अंतरावरील गावात व्हरिनिया शिरली. साधेसुधे गॉलिश वंशाचे शेतकरी तेथे राहात होते. तिथल्या लोकांना वाटले की ती पळून आलेली गुलाम आहे. पण त्यांना काही फरक पडत नव्हता. तिथल्या एका शेतकऱ्याने तिला आश्रय दिला. त्याची बायको प्रसुतीच्या वेळेस मृत्युमुखी पडली होती. त्यालाही लहानग्याला सांभाळायला कुणीतरी हवे होते. व्हरिनियाचे मूल त्याने आपले मानले. गावकऱ्यांच्या साक्षीने तिच्याशी लग्न लावले. ते सगळे साधे लोक होते. बहुतेकांना लिहिता वाचता येत नव्हते. जीवनाचे सगळे धडे त्यांना श्रमातून, कष्टातून व निसर्गातून मिळत होते. भरपूर मेहनत करणारी साधीसुधी व्हरिनिया सर्वांना आवडली. तिच्या नवऱ्याला तर ती विशेष आवडली. त्याच्या जीवनात ती आनंद घेऊन आली होती. तिचा नवरा स्पार्ताकुससारखाच होता. चिकाटीने जीवनाला सामोरा जाणारा. त्याला क्वचितच राग येत असे. मुलांवर त्याचे विलक्षण प्रेम होते. त्याच्यापासून तिला सात मुले झाली. छोटा स्पार्ताकुसही त्यांच्यातच वाढू लागला. तीन मुली- पाच मुलांचा त्यांचा संसार फुलत फळत गेला. स्पार्ताकुस सात वर्षांचा झाल्यानंतर तिने पहिल्यांदा त्याला त्याची जन्मकहाणी सांगितली. त्याचा बाप कोण होता हेही सांगितले. त्याने रोममध्ये केलेल्या क्रांतीची कथाही तिने त्याला सांगितली. तिला आश्चर्य वाटले की त्याने सगळे अगदी छानपणे समजून घेतले. गावात कुणीही स्पार्ताकुस हे नाव याआधी ऐकले नव्हते. मुले मोठी होता होता अनेकदा तिने स्पार्ताकुसची कहाणी त्यांना सांगितली.

**स्पार्ताकुस :** एक साधा गुलाम आणि त्याची दहशत व दडपशाहीविरुद्धची लढाई... ती चार वर्षे.... जेव्हा स्पार्ताकुसचे नाव उच्चारताच रोमचा थरकाप उडायचा. स्पार्ताकुसने जिथे घाम गाळला त्या कोळशाच्या खाणींची वर्णने ती करायची. रोममधील झुंजीच्या रिंगणाची वर्णने ती करायची. नुसता चाकू हातात घेऊन स्पार्ताकुस या रिंगणामध्ये कसा लढला ते सांगायची. तो किती साधा आणि चांगला होता, किती दयाळू होता, ते सांगायची. गावातल्या लोकांपैकीच कुणाचा तरी दाखला द्यायची. म्हणायची, असा होता स्पार्ताकुस.

छोटा स्पार्ताकुस वीस वर्षांचा असताना साध्या तापाचे निमित्त झाले. तीन दिवसात तिने अखेरचा श्वास घेतला. फारशा यातना न होता ती गेली.

तिच्या मृत्यूनंतर काही काळाने जगात होणारे बदल हळूहळू गावापर्यंत पोहचू लागले. सरकारने एका पाठोपाठ एक कर वाढवायला सुरुवात केली. एका वर्षी दुष्काळ पडला. शेतकरी कर भरू शकले नाहीत. त्या वर्षी रोमन सैनिक गावात आले. ज्या कुटुंबांना कर भरता आला नाही त्यांना घराबाहेर काढून त्यांच्या मानेला साखळ्या बांधून सैनिक घेऊन जायचे. या लोकांना गुलामांच्या बाजारात विकायचे आणि आलेला पैसा कर म्हणून जमा करायचा अशी सरकारची योजना होती. रोमन सैनिक आले तेव्हा स्पार्ताकुस आणि त्याच्या भावाबहिणींनी जवळच्या जंगलाचा आश्रय घेतला. झाडावरची फळे खाऊन आणि शिकार करून त्यांची गुजराण होत असे. काही दिवसांनी गावातल्या त्यांच्या जमिनीवर एक मोठा बंगला कुणीतरी उभा केला. स्पार्ताकुसने अकस्मात हल्ला चढवून तो बंगला नष्ट केला व त्यातल्या सर्व चीजवस्तू घेतल्या. पुन्हा रोमन सैनिक आले. जंगलात घुसले. शेतकऱ्यांनी छोट्या स्पार्ताकुसशी हातमिळवणी करून सैनिकांबरोबर झुंज दिली. पळून आलेले गुलामही त्यांच्यात सामील झाले. वर्षामागून वर्षे लढाई सुरू राहिली. कधी सैनिक प्रबळ ठरायचे तर कधी बंडखोरांची सरशी व्हायची. अशा प्रकारचे जीवन जगताजगता स्पार्ताकुसही एका संघर्षात मारला गेला. बापासारखाच. त्याच्या मुलांना त्याने सांगितलेल्या कहाण्यांच्या दंतकथा झाल्या. त्याचीच पुढे प्रतिके झाली. दडपणारे आणि दडपले जाणारे यांच्यातील संघर्ष सुरूच राहिला. एखादी ज्वाला लहान मोठी व्हावी तसा हा संघर्ष कधी [illegible] स्वरूपात तर कधी उग्र स्वरूपात सुरूच राहिला. स्पार्ताकुसचे नाव कधीच नष्ट झाले नाही. ते नाव आता कुणा वंशजाचे राहिले नाही. लोकांनी चालवलेल्या लढ्यातून ते शाबूत राहिले.

कधी तरी अशी वेळ येईल गुलाम व शेतकरी, जंगलातील जमाती, काबाडकष्ट करणारे सगळेच लोक एक होतील व रोमचा पाडाव करतील. तोपर्यंत संघर्ष सुरूच राहील. सामान्य माणसे मेहनत करताहेत व मूठभर माणसे त्या मेहनतीची फळे चाखताहेत. अशी व्यवस्था जगात जोपर्यंत आहे तोपर्यंत स्पार्ताकुसचे नाव विस्मरणात जाणार नाही. कधी ते कुजबुजले जाईल तर कधी घोषणेसारखे मोठ्याने उच्चारले जाईल आणि आसमंत दुमदुमून जाईल

**स्पार्टाकुसच्या सेनेने रणांगणात रोमन सैन्याचे शिरकाण केल्यावर एका रोमन सैनिकाला खास जीवदान देऊन रोमन सम्राटाकडे रवाना केले. त्याला स्पार्टाकुसने निरोप दिला.**

“

''हे सैनिका, जा आणि सांग त्या रोमन सम्राटाला की
तुम्ही माणसांच्या दोन जाती निर्माण केल्या, मालक आणि गुलाम.
पण लक्षात घ्या, आम्ही गुलाम तुमच्यापेक्षा संख्येने अधिक आहोत.
आणि तुमच्यापेक्षा चांगले देखील आहोत.
किती हिंस्त्र आणि बीभत्स लोक आहात तुम्ही!
आणि आयुष्याचा अगदी चोथा करून टाकला आहे तुम्ही.
कष्ट आणि घामाची तुम्ही थट्टा चालवली आहे.
तुम्ही तुमचे वैभव जगाला नाडून मिळवले आहे.
तुम्ही चोर आहात, सगळ्या जगाची लुबाडणूक करणारे.



यापुढे ही पिळवणूक चालणार नाही.
जगातील सर्व गुलामांना आम्ही जागे करू.
सांगू, उठा, तुम्हाला बांधून ठेवणाऱ्या शृंखला तोडून टाका.

सांग तुझ्या सिनेटला जाऊन, की आम्ही येणार आहोत.
येताना रोमच्या उत्तुंग भिंती आम्ही उलथून पाडू आणि ते आमचा न्याय करायचे तसाच त्यांचाही न्याय केला जाईल.

न्यायदान झाल्यानंतर आम्ही स्वच्छ, सुंदर शहरे उभारू, पण या शहरांभोवती भिंती नसतील. तिथे सारी माणसे माणूस म्हणून जगतील. बंधुभावाने, सुखशांती समाधानात!

हा माझा संदेश आहे. त्यांना
नावाच्या गुलामाचा हा नि

”